संगीत

# रायगडची राणी



विठ्ठल वामन हडप




मूल्य दीड रुपया

# प्रास्ताविक निवेदन

छत्रपति संभाजीमहाराजांच्या कारकीर्दीचा व आयुष्याचा शोक-संतापजनक अंत हा प्रसंगच इतका विस्मयकारक व अंतःकरणाला पीळ पाडणारा आहे कीं, त्या प्रसंगावर नाटक, कादंबरी, काव्य असें विविधरूपी वाङ्मय आजवर पुष्कळच निर्माण झालें असूनही त्या प्रसंगांतील नावीन्य अणुरेणुमात्र ओसरलेलें नाहीं. तोच प्रसंग स्थूलमानानें जमेला धरून मीं 'रायगडची राणी' या नाटकाची रचना केली आहे. या कथानकांत तद्विषयक ऐतिहासिक सत्य स्थूलमानानें पायारूप मानून त्या पायावर कथानकाची बरीचशी काल्पनिक उभारणी करण्यांत आली आहे. संभाजीमहाराजाच्या वधापूर्वी सुमारें चार पांच महिने ही कथानकाची कालमर्यादा गृहित धरली आहे. नाटकांत रायगडच्या राणीला अर्थात् राणी येसूबाईला प्राधान्य देण्यांत नावीन्य हा हेतु तर आहेच, पण त्याशिवाय येसूबाई ही चतुर साध्वी असतांही तिच्या चातुर्याचा उपयोग संभाजीमहाराजांची सुधारणा होऊन राजवटीची आबादानी राहण्याकडे कां होऊं शकला नाहीं, आणि वणव्यांत सांपडलेल्या जाईच्या पुष्पाप्रमाणें तिची अवस्था कां झाली, या पडद्यामागील सत्यावर प्रकाश पाडण्याचा बलवत्तर हेतु या योजनेच्या मुळाशीं आहे. या भूमिकेला कांटेतोल ऐतिहासिक आधार कदाचित् नसेल; पण गुण्य व गुणक या निश्चित संख्यांचा गुणाकारही जसा निश्चित असतो, त्याप्रमाणेंच संभाजीमहाराज व कलुषा या दोघांच्या कारभाराचा व वर्तनाचा त्या साध्वीच्या आयुष्यावर काय परिणाम झाला असेल याचा कार्यकारणभावानें निष्कर्ष काढूं लागल्यास तो प्रस्तुत नाटकांतील येसूबाईच्या भूमिकेहून सहसा निराळा निघूं शकणार नाहीं.

संभाजीमहाराजांच्या चरित्रावर आजवर गोष्टी, कादंबऱ्या नाटकें वगैरेच्या रूपानें जो प्रकाश पाडण्यांत आला आहे, तो बराच विपर्यस्त आहे. एखाददुसरा अपवाद सोडला तर इतरांनीं संभाजीमहाराजांना व्यसनांची व दुर्गुणांची मूर्ति ठरविण्याचा अक्षम्य अन्याय केला आहे असें अलीकडील ऐतिहासिक शोधांवरून कबूल करणें प्राप्त आहे. संभाजीमहाराजांवर परस्त्रीगमनासारखे भयंकर आरोप करणारांनीं त्यांना विषयलालसेचे दास ठरवितांना हें अवश्य लक्षांत घेतलें पाहिजे कीं,

ते जर खरोखरच तसे असते, तर त्यांचा एकीहून अधिक राण्या करण्यालाही कोणी हात धरला नव्हता. त्यांतूनही त्यांच्या हातून तशी एखादी चूक झाली असेल, पण ती त्यांच्या अविचाराची व चित्तचांचल्याची द्योतक ठरूं शकेल, तेवढ्यानें तशी त्यांना संवयच होती असें म्हणतां येणार नाहीं. संभाजीमहाराज हे अद्वितीय शूर, उमद्या वृत्तीचे, बाणेदार व निस्सीम स्वाभिमानी होते, याला इतिहासाची पूर्ण साक्ष आहेच. असें असतां त्यांच्या हातून युवराजपणांत कांहीं प्रमाद घडले व त्यामुळें शिवाजीमहाराजांना राग येऊन त्यांनीं त्यांना पन्हाळगडी कैदेत ठेवलें: ते प्रमाद त्यांच्या हातून बहुश: कुसंगति व कुटुंबांत सोयराबाईप्रभृति मंडळींनीं माजविलेले गृहकलह यामुळेच घडून आले असले पाहिजेत. ते विलासप्रिय होते, तरुण होते, व हूडही होते. तशांत शिवाजीमहाराजांना त्यांच्या बाळपणापासून त्यांच्याकडे पुरेसें लक्ष्य द्यावयाला सवड मिळाली नाहीं व गृहकलहामुळे घरांतही त्यांचें मन रमावें तितकें रमणें शक्य नव्हतें. पन्हाळगडी कैद वांट्याला आली यांत त्यांच्यासारख्या मानी तरुणाला असह्य अपमान वाटणें स्वाभाविकच होते. त्यांत आणखी शिवाजीमहाराजाच्या पश्चात् राजाराममहाराजांना गादीवर बसविण्याच्या कल्पनेनें उचल खाल्ली, त्यामुळें आगींत तेलाचा शिडकाव झाल्याप्रमाणें झालें. त्या क्रोधातिरेकाच्या भरांत संभाजीमहाराजांनीं संशयग्रस्त बनून रक्तपातासारख्या अनन्वित गोष्टी केल्या त्या निमित्तानें त्यांच्या विरुद्ध वातावरण जें खवळलें, तें शांत होण्याला संधींच मिळाली नाहीं. कलुषासारख्या कलिपुरुषाची दुष्ट संगत त्यांना लाभली, व त्यामुळें त्यांच्या उम्या जन्माचें मातेरें झालें! संभाजीमहाराज हे दुरात्मे अथवा अधम आसुरी मनोवृत्तीचे खास नव्हते. पुरेसा दूरदर्शीपणा किंवा शांत स्वभाव या ईश्वरी देणग्या त्यांना लाभल्या नव्हत्या; यास्तव त्यांना आपण दुर्दैवी म्हणूं शकूं. पण अपराधी म्हणूं शकणार नाहीं. अविचाराच्या व कांहींशा भोळ्या वृत्तीच्या भरांत त्यांच्या हातून अन्यायाचीं जीं कृत्यें झालीं तीं त्यांनीं हेतुपुर:सर केलीं असें कोणालाही म्हणतां येणार नाहीं; व त्यांचा तिरस्कार करावा असें न वाटतां कींवच करावीशी वाटेल निर्विकार दृष्टीनें त्यांच्या चरित्राचें पर्यालोचन केल्यास त्यांचे प्रमाद जमेला धरतांही त्यांनीं नऊ वर्षाच्या कारकीर्दीत अनेकदां यथावत् राज्यकर्तेपणा गाजविला व वडिलांच्या कीर्तीला साजेसें यश संपादन केलें, असें उघड दिसून येतें.

सभोंवारची प्रतिकूल परिस्थितीत, कलुषांची कुसंगति, मायेच्या बहुतेक माणसांचा

ळला कोणत्या ना कोणत्या कारणामुळें तुटलेला, इतक्या सर्व दृश्यादृश्य अडचणींतून मार्ग काढण्याला आवश्यक असणाऱ्या धूर्तपणाचा बराचसा अभाव: आणि तारुण्य, सौंदर्य, राजवैभव यांचा एकसमयावच्छेदेंकरून लाभ, या साऱ्यांचे भयंकर दुष्परिणाम खुद्द संभाजीमहाराजांना, राणी येसूबाईला व साऱ्या राजवटीला कसे भोगावे लागले असतील, हें कल्पनाचित्र उठावदारपणें चित्रित करण्यासाठींच कमळजा या पात्राची योजना मीं केली आहे. संभाजीमहाराजांवरील व्यसनाधीनतेच्या आरोपाची संगति लावण्याला अन्य मार्गच नाहीं. कमळजा हें पात्र काल्पनिक आहे, त्याप्रमाणेंच राणोजी शिर्के हें पात्रही काल्पनिकच आहे. पण संभाजीमहाराजांनीं शिर्क्यांचें शिर्काण केलें हें ध्यानीं घेतां राणोजी शिर्क्यासारखे त्यातलेच प्रतिस्पर्धी त्यांना कांहीं भेटणें अगदीं स्वाभाविक आहे. कलुषाची भूमिका तत्कालीन बव्हंशीं यथावत् आहे. तो बादशहाचा हेर होता असें मानण्याला आनुषंगिक परिस्थितीचा पुरेसा आधार आहे. त्यानें आपल्या रूपवती भार्येच्या साह्यानें महाराजांना वश केलें असाही एक ऐतिहासिक प्रवाद आहे. मग तो खरा असो कीं खोटा असो. मात्र कलुषाचा शेवट बादशहाच्या आज्ञेवरून झाला असें जरी इतिहास सांगतो, तरी कथानकाच्या सोईसाठीं त्याचा शेवट अमळ निराळ्या प्रकारें झाल्याचें या नाटकांत मीं दर्शविलें आहे. जोत्याजी केसरकर या पात्राची ऐतिहासिक यथार्थता सूर्य-चंद्रांइतकी स्पष्ट आहे. संभाजीमहाराजांना संगमेश्वरी पकडणाऱ्या मोगल अधिकाऱ्याची एकाहून अधिक नांवें निरनिराळ्या इतिहासग्रंथांतरीं नमूद आहेत. त्यांपैकीं इलाचीबेग हें नांव मीं कथानकासाठीं गृहित धरलें आहे. आणखी एक गोष्ट एथें जातां जातां उल्लेखून ठेवणें अवश्य आहे. ती ही कीं, याच कथानकावर माझें एक गद्य नाटक इ० स० १९२३ सालीं कांहींसें प्रकाशांत आलें होतें. त्या कथानकांत आमूलाग्र फरक करून प्रस्तुतच्या नाटकाची रचना मी केली आहे.

प्रस्तुत नाटक इतक्या लौकर—लेखनाला प्रारंभ केल्यापासून अवघ्या चारपांच महिन्यांत—इतक्या मनोहर स्वरूपांत रंगभूमीवर येत आहे याचें सारें श्रेय सुविख्यात यशवंत संगीत मंडळीचे मालक-आपल्या कोकिळकंठानें सर्वांना संगीताची मोहिनी घालून डोलविणारे महाराष्ट्रकोकिळ श्री० शंकरराव सरनाईक, व जनरल मॅनेजर श्री बापूराव पवार यांना आहे. या उभयतांचा व माझा स्नेह आतांचा;

पण या पूर्वी आमची नांवओळखीपलीकडे एकमेकाशीं पुरेशी तोंडओळखदेखील नव्हती. अशा स्थितींत या उभयतांनीं मला मुद्दाम पाचारण करून मजकडून हे नाटक आग्रहपूर्वक व आपलेपणानें लिहून घेतलें नसतें तर तें मीं आपण होऊन म्हणजे लिहिलेंच असतें असें नाहीं. नाटकाचें लेखन चालू असतांही श्री. शंकरराव सरनाईक व त्यांचे एक प्रमुख सहकारी नट श्री० करमरकर यांच्या व्यावहारिक व प्रात्यक्षिक सूचनांचा मला अमोल उपयोग झाला आहे. नाटक जसजसें लिहून झालें तसतसा त्याचा मराठी टाइपरायटरवर सुवाच्य तर्जुमा श्री० करमरकर व 'यशवंत' मंडळींतील विनोदी नट श्री० बाबूराव नाईक यांनीं निरलसपणें करून दिला. नाटकांतील पदांच्या नावीन्यपूर्ण व श्रवणमनोहर चाली श्री० शंकरराव सरनाईक व त्यांचे पुतणे 'यशवंत' मधील उदयोन्मुख तरुण नट श्री० निवृत्तिराव सरनाईक यानीं निवड करून दिल्या आहेत. या मंडळींचें मला हरएक बाबतींत इतकें बिनमोल साह्य झालें आहे कीं, आभारप्रदर्शनाच्या औपचारिक शब्दांनी त्याचें मोजमाप करतां येणें शक्यच नाहीं. नाटकांतील मुसलमानी पात्राच्या तोंडीं प्रसंगोचित उर्दू भाषा घालण्यांत आली आहे; ते सुंदर भाषांतर श्री० शंकरराव सरनाईक यांचे गुरु गायनभीष्म मे० अल्लादियाखांसाहेब यांनीं करून दिलें. 'यशवंत' मधील नटवर्गानें नाटकाच्या पुस्तकांत प्रसंगानुरूप घालण्यासाठीं आपलीं छायाचित्रें दिलीं व सांगलीचे कलावंत फोटोग्राफर श्री० श्रीपतराव चिवटे यांनीं छायाचित्रें घेण्याचें काम फार सुबकपणें केलें. त्याप्रमाणेंच कोल्हापूरच्या महाराष्ट्र फिल्म कंपनींतील कलाभिज्ञ आर्टिस्ट मंडळीनें नाटकांतील देखावे सुंदर तयार करून दिले, याबद्दल मी त्या सर्वांचा आभारी आहे.

याशिवाय मिरज स्टेशनवरील हिंदु रिफ्रेशमेंट रूमचे चालक माझे स्नेही श्री० शंकरराव मुजुमदार, श्री० माधव व्यंकटेश मंगसुळीकर व श्री० अनंतराव कमतनूरकर हे कविमित्रद्वय, मडगांव ( गोवें ) एथील नूतन स्नेही श्री० नीलकंठ विठ्ठल दळवी व मित्र० नारायणराव सरनाईक यांचीही मला या कामीं निरनिराळ्या स्वरूपांत पुष्कळच मदत झाली आहे. त्याबद्दल त्यांचा मी ऋणी आहे. 'विजय' प्रेसचे मालक मित्र० अप्पासाहेब गोखले यानीं अपुऱ्या मुदतींत नाटक सर्वांगसुंदर छापून दिलें व परचुरे, पुराणिक आणि मंडळीनें प्रसिद्ध केलें, याबद्दल त्यांचे आभार मी मुद्दाम मानीत नाहीं. कारण 'कादंबरीमय पेशवाई' च्या मुद्रण-प्रकाशनाला

प्रारंभ झाल्यापासून अशीं एकमेकांची कामें आपलेपणानें करण्याचा हक्क परस्परांमधील जिव्हाळ्याच्या स्नेहसंबंधानें परस्परांना स्वाभाविकपणेंच प्राप्त झाला आहे.

या नाटकाचा प्रथम-प्रयोग शनिवार, ता. १५ ऑगस्ट १९३१ रोजीं सोलापूर मुक्कामीं मेकॅनिक्स थिएटरांत झाला.

कादंबरीकार या नात्यानें मी सर्वांना सुपरिचित असलों तरी नाटककार या नात्यानें समाजासमोर येण्याचा हा माझा बव्हंशीं पहिलाच प्रयत्न आहे. ह्या नवीन वाङ्मय-क्षेत्रांतील माझी यथामति सेवाही माझ्या कादंबरीलेखनाप्रमाणेंच गोड करून घ्यावी व मला या नव्या क्षेत्रांत उत्तरोत्तर अधिकाधिक यश लाभो असा शुभाशीर्वाद द्यावा, अशी माझी जनताजनार्दनाच्या चरणीं मनःपूर्वक प्रार्थना आहे.

**विठ्ठल वामन हडप**

## पात्रें

१ कमळजा
२ गजरा
३ राणोजी
४ तानाजी
५ निराजी
६ पिराजी
७ जोत्याजी
८ येसूबाई
९ विद्याधर
१० कलुषा
११ संताजी
१२ संभाजी
१३ मिर्झाबेग
१४ इलाचीबेग

# रायगडची राणी

## १

### ईशवंदन

वंदूं ईशा त्रिगुणेशा। पदकमलां ॥ वंदूं० ॥ दीनांचा वाली।
सदय बहु। शुभ सकलां ॥ धरु० ॥ त्रिविध-मति-दुरितारि।
भवभय हरी। सुखकारी। दावित विश्वा सुपथाला ॥ १ ॥

[ रायगडावरील एका वाड्यासमोरच्या उद्यानांत **गजरा** हार गुंफीत बसली आहे; तोंच **कमळजा** प्रवेश करते. ]

**कमळजा :** गजरे, अजून दादा ग कसा आला नाहीं? आतां इतक्यांत महाराज जर इथं आले,—हो! त्याचा काय नेम! कबजी एवढे मोठे अमात्य, पण ते सुद्धा येऊन माझा कुशल समाचार घेऊन गेले! तसेच महाराजदेखील यायचे एखाद वेळीं!

**गजरा :** आले तर आले महाराज. त्यांत एवढं घाबरायला नको कांहीं! तुला महाराज ओळखतात. पण राणीसाहेब, आपण महाराजांबरोबर सिंहासनाच्या पायऱ्या चढतांना या पायांतळच्या पायवडीला विसरायचं नाहीं म्हटलं!

**कमळजा :** पण मला राणीसाहेब होऊं द्या तरी!

**गजरा :** तूं आतां राणीसाहेब झाल्यासारखीच आहेस, आणि मी तुझी पाठराखीण. मी कालपासूनच सर्वांना सांगायला सुरुवात केली आहे कीं, माझी मैत्रीण कमळजा आतां महाराजांची राणी होणार!

[ पडद्यांत 'राणी कीं रखेली' असा ध्वनि होतो. ]

**कमळजा :** कोण अभद्र बोलतं आहे हें? सकाळच्या रामप्रहरीं असलं अमंगळ कोण बोलतं आहे?

[ **राणोजी** प्रवेश करतो. ]

**राणोजी :** मी बोलतो आहे. कमळजे, लहानपणापासून तुला कडेखांद्यावर खेळवून तुझ्यावर पोटच्या पोरीप्रमाणें प्रेम करणारा हा राणोजी शिर्का बोलतो आहे. तूं नानाजीबरोबर मोगलाईतून इकडे आलीस असें कळतांच मी तुझा शोध करीत इकडे आलों. कमळजे, तुला माझ्या बोलण्याचा राग आला असेल?

**गजरा :** राग आला असेल म्हणजे ?—यांच्या जिभेला कांहीं ताळ आहे कीं नाहीं !

**राणोजी :** ( रागानें ) ए बटकीच्या पोरी, जीभ इतकी सैल सोडूं नकोस ! मोठी आली मालकिणीचा कैवार घ्यायला.

**गजरा :** कैवार घ्यायला म्हणजे ?

**राणोजी :** चूप !

**कमळजा :** गजरे, तूं आंत जा कशी !

**गजरा :** ( जातांना रागानें ) ठीक आहे. याद राखून ठेवा म्हणावं, मी बटकीची पोर असलें तरी कबजींची दासी आहे. कबजींना सांगून तुमची खोड मोडली नाहीं तर नांवाची गजराच नव्हे. [ जाते.

**राणोजी :** कमळजे, तूं गप्प कां ?

**कमळजा :** गप्प राहूं नाहीं तर काय करूं ? राणूबाबा, तुम्ही आम्ही खानदानीच्या मराठकुळींचीं माणसं. तशांत तुम्ही मला आपली मुलगी मानतां.— मला असलं अभद्र बोलणं तुम्हाला शोभलं कां ?

**राणोजी :** कमळजे, मी अभद्र बोललो खरा. पण माझा आजवरचा अनुभव मला असें बोलायला भाग पाडीत आहे. आजवर तुझ्यासारख्या केक पवित्र कुमारिका ह्या कामांध राजापायीं जन्मांतून उठल्या आहेत. तुला इकडे येतांच हा राजवाडा रहायला मिळाला, यावरून माझी पूर्ण खातरजमा झाली आहे, कीं तूं कबजींच्या कारस्थानाला हटकून बळी पडणार. तूं राजांची रखेली होणार.

**कमळजा :** ईश्वर करो आणि तुमची ही अमंगळ भविष्यवाणी खोटी ठरो. कुणीं कांहींही सांगितलं तरी माझा महाराजांवर पूर्ण भरंवसा आहे. पण तें मी आजच कशाला बोलून दाखवूं ! मी एकदांची राणी झाल्ये म्हणजे तरी तुमचं समाधान होईल ना ?

**राणोजी :** नाहीं—नाहीं ! कमळजे, तूं राणी झालीस तरीदेखील माझं समाधान व्हायचं नाहीं. मूर्ख मुली, ज्या नीच राक्षसानें नाहक संशयाच्या भरी पडून तुझ्या वरदारावरून गाढवांचा नांगर फिरवला,—ज्याच्या करावकरणीमुळें तुझ्या बापाला तुम्हां दोघां मुलांसह मायभूमि सोडून मोगलाईचा आश्रय करावा लागला, त्याची तूं बाईल होऊन हाडवैऱ्याचा वंश वाढीला लावणार काय ! कमळजे, गंगाजीनें घर सोडून वनवासी होतांना कोणती घोर प्रतिज्ञा केली आहे, याची तुला जाणीव आहे कां ?

**कमळजा :** सांगत्यें ना, मला सगळी जाणीव आहे. पण पुढं काय?

**राणोजी :** ती गंगाजीची प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठींच जर तूं इकडे आली असलीस तर इतका वेळ मी बोल्लों तें बिनशर्त मागें घेतों.

**कमळजा :** काय—काय म्हणतां तुम्ही ? माझ्या नीटसं ध्यानीं नाहीं आलं. बाबांची कसली प्रतिज्ञा म्हणतां—आणि ती मीं कशी पुरी करायची ? स्पष्ट सांगा पाहूं !

**राणोजी :** गंगाजीची प्रतिज्ञा राजावर सूड घेण्याची आहे. ती जर तूं पूर्ण करणार असलीस तर मग कांहीं हरकत नाहीं. ती प्रतिज्ञा पूर्ण करतांना तुझ्या चारित्र्याला कलंक लागला तरी तो राजाच्या रक्तानें धुऊन निघेल व मध्यांच्या राजवटींत गांजून गेलेली मराठी रयत तुला शतशः धन्यवाद देईल.

**कमळजा :** ( थोबाडीत मारून घेऊन ) शिव ! शिव ! राणूबाबा, काय बोलतां हे ! महाराजांवर सूड घेण्यासाठीं मला महाराजांची रखेली व्हायला सांगतां ! असले पापी बोल बोलणारी तुमची जिव्हा झडून कशी पडली नाहीं ! मी बायको माणूस म्हणून मुकाट्यानं ऐकून तरी घेतलं; दादाला हें जर कळलं,—कळलं का !

**राणोजी :** दादा-बाबाचें भय कुणाला घालतेस, मला ? आणि त्या रंगेबाज राजाचा कैवार घेऊन !

[ **तानाजी** प्रवेश करतो ]

**तानाजी :** हां ! राणूबाबा, जरा आंखडल्या जिभेनें बोला. तुम्ही वडील माणूस पडला म्हणून सामोपचारानें सांगतों. तुमच्या जागीं दुसरा कोणी असतां तर त्याची जीभच या क्षणाला आखूड केली असती.

> **असुरा खला ! तूं भूपा दंशाया येसी । साप जसा साचा ॥ध्रु०॥**
> **अधमा ! कसा भ्रांता ! वदसी विषारी बोलां । शिणली वृथा वाचा ॥ १ ॥**

**कमळजा :** दादा, हे मला कसकसे असभ्य बोलले तें जर तूं ऐकलं असतस तर—

**राणोजी :** तर काय झालें असतें ? यानें माझें मुंडकें छाटलें असतें ? अंतःकरणांतील तळमळ बोलून दाखवायला मायेच्या माणसांपाशीं देखील जागा नाहीं अं !

**तानाजी :** काय बोलले ? कमळजे, हे काय बोलले मला ऐकूं दे !

**राणोजी :** बोललों, होय मी बोललों. — आणखी बोलेन ! एकवार बोललों नसें आणखी सहस्रवार बोलेन. मनःपूत वाटतें तें बोलायला हा राणोजी शिर्का ब्रह्मदेवाला ही भ्यायचा नाहीं, तो तुमच्यासारख्या कालच्या पोरांना भिईल काय ?

**तानाजी :** काय बोलले ? कमळजे, हे काय बोलले ? मला ऐकूं दे तर खरें !

**कमळजा :** कानांनीं ऐकवणार नाहीं असें बोलले !

**राणोजी :** कानांनीं ऐकवत नाहीं तर कानांत बोटें घाला. मी बोलणार. कमळजे, मी तुझ्यापाशीं तसें बोलायला नको होतें हे एका अर्थी खरें. पण ती आठवण–ती भयाण आठवण झाली, कीं माझें मन मला आवरेनासें होतें. कपाळकरंट्या संभाजी राजानें आम्हां शिर्क्यांचें शिरकाण केलें ! ती आठवण त्या कुळांतला शिर्का मी कसा विसरेन ! मी मेलों तरी माझी ती आठवण मरायची नाहीं. शिर्क्यांनीं राजाचें असें काय घोडें मारलें होतें कीं राजाने त्यांचीं पाळेंमुळें खणून काढलीं ? शिर्क्यांनीं पिढ्यान्‌पिढ्या नानापरीच्या खस्ता खाऊन मराठशाहीचा इमला सांवरुन धरला, जीवाभावाच्या मोलानें छत्रपतींच्या गादीची सेवा केली, त्याचा मोबदला म्हणून राजानें फितुरीचा डाग आमच्या कपाळीं लावून लांडगेतोडीनें आमची संभावना केली ! तो फितुरीचा काळा डाग धुऊन काढायचा तर तो ह्या मदांध राजाला ठार मारुन त्याच्या रक्तानेंच धुऊन काढला पाहिजे.

**तानाजी :** काळसर्पा, तूं राजांच्या जिवावर टपून बसला आहेस काय ?
( तरवार म्यानांतून बाहेर काढतो. )

**कमळजा :** ( चटकन पुढें होऊन तानाजींचा हात धरुन ) हां दादा, हात आवर–हात आवर. राणूबाबा कसे झाले तरी वडील माणूस आहेत.

**तानाजी :** वडील माणूस असले म्हणून काय झालें !–राजांना ठार मारायचे बेत करतां काय ? ( पुन्हां तरवारीला हात घालतो. )

**राणोजी :** ( तरवारीला हात घालून ) नाहीं तर काय करूं ? मानवैभवाच्या लाल-सेनें माझ्या लेंकी–बहिणी ( कमळजेकडे बोट करुन ) अशा राजांच्या रंगमहालांत पाठवून त्यांचा मिंधा होऊं ?

**तानाजी :** ( तरवार उगारुन राणोजीवर धांवतो; कमळजा त्याचा हात धरुन त्याला आंत ओढून नेऊं लागते; तिच्या हाताला हिसडे देत ) सोड–माझा हात सोड. ह्या राजद्रोही सैतानाला त्याच्या पापाचें प्रायश्चित्त मिळालेंच पाहिजे.

**कमळजा :** तुला माझ्या गळ्याचीं शपथ आहे दादा, बाबांच्या गळ्याची शपथ आहे. महाराजांच्या गळ्याची शपथ आहे. चल पाहूं आंत अगोदर ! ( त्याला आंत ओढून नेते. )

**राणोजी :** ( स्व. ) ही बहीण-भावंडें जर आजपासूनच माझ्याशीं बिथरून राहिलीं तर शिर्क्यांच्या शिरकाणाचा सूड घेतांना उगाच नखाच्या कामाला कुऱ्हाडी लागा-यच्या. त्यापेक्षां आजपासून पश्चात्तापाचा बहाणा करून त्या दोघांच्या तंत्रानें वागूं लागावें हा सोपा मार्ग. मी आजवरचें वैर विसरून पूर्ववत् राजघराची सेवा करायला तयार आहे असें म्हणायचा अवकाश, कीं संभाजी राजा मला ताईताप्रमाणें कंठीं धारण करील. सूड घेण्याला अनुकूल संधि प्राप्त होईपावेतों दबा धरून बसायला याशिवाय अन्य उपायच नाहीं. मात्र सूडाची भावना अंतःकरणांत जागृत झाली, कीं राणी येसूबाईची मूर्ति माझ्या डोळ्यापुढें येऊन उभी राहते. राणीला मीं लहान-पणापासून माझी धाकटी बहीण मानली आहे. मीं राजावर सूड घ्यायचा म्हणजे स्वतःच्या हातानें त्या मानलेल्या बहिणीच्या कपाळींचें कुंकू पुसायचें हाच त्याचा अर्थ ! पण छे ! असला विवेक या वेळीं उपयोगाचा नाहीं. बस्स ! राणी विधवा होवो किंवा कांहीं होवो, मला त्याची मुळींच पर्वा नाहीं. या बेबंदशहा संभाजीच्या अमानुष अत्याचारांना बळी पडलेल्या माझ्या पूर्वजांनों, संभाजीच्या रक्तानें मला तुमचें तर्पण करून तुम्हांला मोक्षाचा मार्ग मोकळा करून द्यायचा असल्यामुळें मला या कामीं तुम्हां सर्वांच्या पूर्वपुण्याईचें पाठबळ पाहिजे आहे. [जातो.

: : २ : :

[ कलुषाच्या वाड्याची देवडी. निराजी पाहरा करीत उभा आहे. ]

**निराजी :** दरिद्री चले दर्याकू तो कर्म चले साथ; मोतीखातर डूब मारे—

**पिराजी :** ( प्रवेश करून ) और शंख लगे हात ! निराजी, सेनासागराकडे तूं गेलास तो शंखच हातीं लागला वाटतें ?

**निराजी :** अरे बाबा, तुला काय सांगूं ?—

**पिराजी :** सेनासागरानें काय सांगितलें तें सांग !

**निराजी :** सांगायचें काय ! —जातकुळीचा पत्ता नाहीं.

**पिराजी :** कुणाच्या ! तुझ्या कीं सेनासागराच्या ?

**निराजी :** माझ्या जातकुळीचा पत्ता नाहीं, म्हणून सेनासागरानें मला खाशा सैन्यांत नोकरी देण्याचें नाकारलें. खाशा सैन्यांत अस्सल जातकुळीच्या मराठ्या-शिवाय पायदळदेखील नेमायचें नाहीं असें सेनासागर म्हणाला.

**पिराजी :** होय का ? मग मी तुझ्याबरोबर सेनासागराकडे आलों नाहीं हें फार चांगलें झालें म्हणायचें ! एकूण हा मराठ्यांचा सेनासागर मोठा तऱ्हेवाईक

माणूस दिसतो ! याला सैन्यांत शिपायांची भरती करून लढाया मारायच्या आहेत, कीं सैन्यांतील शिपायांच्या जातकुळ्या शोधून त्यांच्या बेचाळीस पूर्वजांचीं श्राद्धें-तर्पणें करायचीं आहेत?

**निराजी :** मी तरी तेंच म्हणतों, गडी चांगला जवान, हाडींपेरीं भरभक्कम निधड्या छातीचा पहावा आणि सैन्यांत ठेवून घ्यावा. तिथें त्याच्या जातकुळीची चौकशी कशाला हवी ?

**पिराजी :** पण जातकुळीवांचून कुठें नडतें, असें तूं सेनासागराला विचारावयाचें होतेंस.

**निराजी :** अरे, मीं त्याला तसें विचारलें.

**पिराजी :** मग तो काय म्हणाला ?

**निराजी :** तो म्हणाला, कीं कुणी झाला तरी आपल्या जातीवर जातो. जातिवंताचा बच्चा जातिवंत निपजतो. तो वेळीं स्वतःचा जीव गमवील; पण धन्याच्या जिवाला जीव देईल !

**पिराजी :** म्हणे धन्याच्या जिवाला जीव देईल ! जीव देणें म्हणजे शाळूच्या शेतांतला मूठभर हुरडाच खुडून देणें आहे, जसें कांहीं !

**निराजी :** आतां कसें बोललास ! तेंच–अगदीं तसेंच मी सेनासागराला म्हणालों, कीं जीव देणें म्हणजे परसांतील मूठभर भाजीच तोडून देणें आहे जसें कांहीं !

**पिराजी :** छान छान केलेंस ! मग सेनासागर अगदीं चारी मुंड्या चीत झाला असेल नाहीं ?

**निराजी :** छे रे ! तो निगरगट्ट कसला चीत होतो ! तो उलट मला म्हणतो काय, कीं जातिवंत शिपायांचीच खाशा सैन्यांत भरती करायची ती एवढ्याच साठीं. आणि वर मला टोंचून बोलला, कीं अस्सल जातकुळीच्या शिपायाला स्वामिकार्यापुढें स्वतःच्या जिवाची पर्वा परसांतल्या भाजीइतकीदेखील वाटत नसते.

**पिराजी :** याला सेनासागर कुणीं केलें ? राजांच्या जिवासाठीं सर्वांगसवदा जीव विकणारा ताबेदारी बांक्याचा माणूस हा, याला सेनासागर केलें कुणी ? निराजी, मी देखील तुझ्यासारखाच जातकुळीचा थोर मराठा नाहीं खरा; पण यःकश्चित् एका राजासाठीं सैन्यांतल्या शिपायांनीं पटापट आपले बळी द्यावे असें म्हणणारा माणूस जातकुळीचा थोर असलाच पाहिजे असें म्हणायला मी तर बुवा तयार नाहीं !

**निराजी :** मग तूं कुणाची जातकुळी थोर म्हणशील ?

**पिराजी :** खरें सांगूं ?–मला तर बुवा या जातकुळीच्या थोरपणांत कांहींच राम वाटत नाहीं.

**निराजी :** तसाच मलादेखील वाटत नाहीं. पण मी सेनासागराला तसें म्हणालों तेव्हां तो उलट मला म्हणाला, कीं जातकुळीच्या थोरवींतील रामाचें दर्शन जातिवंताला तेवढें होतें.

**पिराजी :** रामाचें नांव निघतांच बरी आठवण झाली. निराजी, तूं सेनासागराला विचारायचें होतेस, सीतेच्या नांवाची जग जी एवढी थोरवी गातें ती रामाची सीता कोणत्या जातकुळीची होती ?

**निराजी :** खरेंच सीता कोणत्या जातकुळीची होती रे ?

**पिराजी :** सांगूं ? कुणी एक बेवारसी मुलगी जनकाला नदीकांठीं सांपडली; तिचें त्यानें संगोपन केलें. जनकाच्या राजेपणाच्या थोरवीखालीं त्या मुलीची जातकुळी झांकून गेली आणि जग तिला भूमिकन्या या नांवानें ओळखूं लागलें. पण वास्तविक भूमि कधीं बाळंतही झाली नाही आणि तिला कधीं कन्याही झाली नाहीं. खरा प्रकार हा असा आहे.

**निराजी :** असें काय ? आणि तीच सीता पुढें अयोध्येची महाराणी झाली ! सीतेची आणि आमची जातकुळी जवळ जवळ सारखीच आहे. असें असतां सीता अयोध्येची महाराणी झाली. आणि आम्हांला–मला काय किंवा तुला काय––खाशा सैन्यांत यःकश्चित् शिपाईगिरीही मिळूं नये ? काय न्याय आहे पहा !

**पिराजी :** याचें कारण-अरे बाबा, सीतेच्या हातीं बांगड्या होत्या ! आणि आमच्या हातीं तरवारच आहे !

**निराजी :** एकूण बांगड्याच तरवारीपेक्षां श्रेष्ठ ठरल्या म्हणायच्या ! वास्तविक बायको हा कुठच्या झाडाचा पाला ! पण आजकाल वखत असा बांका येऊन ठेपला आहे कीं मनाला वाटतें, देवानें बायकोच्या जन्माला घातलें असतें तर फार बरें झालें असतें ! थोरल्या छत्रपतींच्या अमदानींत तरवारीच्या खणखणाटाच्या तालावर मराठ्यांची राजलक्ष्मी आपल्या सौभाग्याची गाणीं गाई, ती आतां छत्रपति संभाजी महाराजांच्या कारकीर्दीत बांगड्यांच्या मंजुळसुरावर नाचूं रंगूं लागली आहे !

**पिराजी :** गोष्ट खरी. पण आतां याला इलाज काय ? आपणाला देखील बुवा तुझ्यासारखाच या देवडीवरील नोकरीचा अगदीं कंटाळा आला आहे ! तुझ्या-

प्रमाणेंच मलाही शिपाईगिरी आवडते. पण ती मिळणार कशी ? हा बेपत्ता जात-कुळीचा समंध आमच्या बोकांडी बसला आहे याला कसें करावें !

**निराजी :** कसें करावें आणि काय करावें असें म्हणत हातपाय गाळून स्वस्थ बसून थोडेंच भागणार आहे ! मी पहा आतां बांगड्यांच्या बेड्या त्या समंधाच्या हाता-पायांत ठोकून त्याला कसा जेरबंदीला आणतों तो !

**पिराजी :** तो कसा काय ?

**निराजी :** बांगड्यांचा वशिला थेट महाराजांपावेतों लावतां येतो, तो मी गजरे-मार्फत लावणार; आणि बहाद्दरीचा वशिला हवा असला तर मी स्वतः बहादुर आहेंच. या गंगा जमनी वशिल्यावर लाग असा बेमालुम साधतों, कीं तें पाहून महाराजां-जवळचे सारे तरवारबहाद्दर चीत व्हावेत ! आतां मी नुसत्या शिपाईगिरीवर समाधान मानायला तयार नाहीं; मी आतां सेनासागर होणार. पिराजी, आहेस कुठें तूं !

**पिराजी :** युक्ति पण युक्ति आहे. एवढें तूं करच. पाहूं तर खरा कसा काय लाग साधतो तो ! तुझें साधलें तर मग मीही गजरेचा वशिला लावीन. बरें, येतों मी आतां, रंगमहालांत आलेल्या महाराजांच्या पाहुणेमंडळीला कबजींचा निरोप पोंचवायचा आहे. [जातो.

**निराजी :** गजरेच्या वशिल्याबद्दल मी याच्यापाशीं उगाच बोललों. आणखी कांहीं नाहीं, हाच माझ्याअगोदर गजरेकडे जाऊन लाग साधायचा ! शिकार साधावी मी आणि रांधून खावी यानें ! (बाजूला पहात ) आ–हा ! देव पावला ! ही गजराच इकडे येते आहे. आतां जरा बाजूला उभे रहावें आणि ती पुढें आली कीं आपला बेत तिला सांगून टाकावा. मग तिच्यापाशीं पिराजीची डाळ कांहीं शिजायची नाहीं. ( बाजूला जातो. )

[पडद्यांत ' गजरे अग गजरे !' अशी हांक ऐकूं येते. गजरा प्रवेश करते.]

**गजरा :** औ बाईसाहेब ! ( पडद्यांत–तूं तिकडे बाहेर काय करते आहेस ? लौकर आंत ये. गुणनिधान झोंपी गेला आहे, त्याच्याकडे लक्ष ठेव. तो उठला तर त्याला रडूं देऊं नकोस. मी तुळशीला जाऊन येते.) बरं बाईसाहेब, गुणीबाळ उठले तर मी आहे जवळ.–कसलं सातां मुलुखांवरून ओंवाळून टाकलेलं खट्याळ पोर ! पण थोरांच्या उदरीं आलं म्हणून गुणी बाळ झालं. ही थोरांघरची ताबेदारी करतां करतां जीव पुरता कंटाळला. पण काय करूं ! बायकांची जात म्हणून माझ्या जन्माला लागलेला बेपत्ता जातकुळीचा डाग धुतला जाण्यासाठीं माझ्या आईनं माझं

लहानपणींच लग्न करून दिलं, आणि हा कुंकवाचा डाग माझ्या कपाळीं लावला. गुराच्या गळ्याला दावं लावतात तसं हें मंगळसूत्राचं दावं माझ्या गळ्यांत अडकवून दिलं. जळ्ळं तें कुंकू आणि जळ्ळें ते मेले कुंकवाचे आधार! लगीनमाळ घालतांना बोहल्यावर नवऱ्याचं तोंड दिसलं आणि तेव्हांपासून जें मेल्याचं काळं तोंड झालं ते आजवर काळंच! तें जळ्ळं काळं तोंड पाहून तेव्हां जो अपशकून झाला तो उभा जन्म पावलोपावलीं नडतो आहे. आपलं ये रे दिवसा भर रे पोटा. आणि दिवस-भर करायचं काय, तर कबजींची पोरं खेळवावयाची! आतां कमळजेची तेवढी थोडीशी आशा वाटते आहे देव करो आणि ती एकदांची महाराजांची राणी होवो. निदान रखेली तरी होवो. म्हणजे मला कांहींतरी बरे दिवस यायचा संभव आहे. आतां तिकडे गेलें म्हणजे तिला पुन्हां बजावून ठेवायला हवं. बाकी कमळजेची झाल्ये तरी दासीच ना! देवा, उभा जन्म लोकांच्या अशा खस्ता खाण्यासाठींच कां रे मला तूं जन्माला घातलंस!

[ **निराजी** प्रवेश करतो. ]

**निराजी :** मुळींच नाहीं.

**गजरा :** कोण निराजी, तुम्ही का ते? आड उभे राहून चोरून ऐकत होतां वाटतं? पण ऐकाना कां ऐकलंत तर! मी तरी काय गैरबांका बोललें! खरंच सांगतें मी तुम्हांला निराजी, हा बायकांचा जन्म मेला अगदीं वाईट!

**निराजी :** कां बरें? मला तरी वाटतें कीं सर्वच बायकांचा कांहीं जन्म वाईट नाहीं.

**गजरा :** पण माझ्यासारख्या बायकांचा जन्म तरी वाईट खास.

**निराजी :** तुझ्यासारख्या म्हणजे कशा?

**गजरा :** या अशा—कुणा मेल्याच्या नांवानं कपाळीं लागलेला हा कुंकवाचा डाग आणि गळयाला लागलेला मंगळसूत्राचा फांस! तशांत नवरा नांदवीना म्हणून जगही नांदवीना! हीच जर मी तुमच्यासारखी पुरुष असतें तर किती छान झालं असतं! खरंच सांगतें तुम्हांला निराजी, आम्ही बायका अगदीं अभागी! तुम्ही पुरुष भाग्यवान्!

**निराजी :** आम्ही पुरुष भाग्यवान्. म्हणे पुरुष भाग्यवान्! गजरे, आम्ही पुरुष भाग्यवान् असायला आमच्या हातीं बांगड्या थोड्याच आहेत! काल मोगलाईतून कमळजा आली. ती उद्यां राजांची राणी होणार; कारण तिच्या हातीं बांगड्या

आहेत! आणि आज मी इतकीं वर्षं हातांत नंगी तरवार घेऊन कबजींच्या देवडीवर खडा पाहरा करतों आहे, तरी सेनासागर मला खाशा सैन्यांतला शिपुरडा देखील करायला तयार नाहीं! आतां तूंच सांग, तरवार थोर कीं बांगड्या थोर? अग, बांगड्यांचा प्रभावच तसा विलक्षण आहे! तुझ्या हातांत बांगड्या आहेत ना? माझी खात्री आहे, तूं देखील मनांत आणशील तर महाराजांच्या मर्जीत जाऊन बसशील. तूं देखील दिसायला कांहीं कमी सुंदर नाहींस.

**गजरा :** अगदीं खरं सांगतां हें?

**निराजी :** अगदीं खरें सांगतों. मग आहे का तसा विचार?

**गजरा :** पण हें कुंकू, हें मंगळसूत्र,—ज्याच्या नांवानं बाटलें त्या मेल्याचं नांव बुडेल ना?

**निराजी :** भलतेंच नाहींतर! कसलें कुंकू आणि कसलें मंगळसूत्र घेऊन बसलीस तूं गजरे! मानला तर देव नाहींतर धोंडा! मनांत यायचा अवकाश, कीं झटक्या-सरसें कुंकू पुसतां येतें आणि मंगळसूत्र तोडतां येतें. नवऱ्याचें नांव टाकून नामा-निराळें व्हायला तर मुळींच श्रम नाहींत. मी जर तुझ्यासारख्या एखाद्या नखरेल बाय-कोचा नवरा असतों, तर जिवंतपणींच तिला अशी नामानिराळी करून तिच्या नांवा-वर स्वतः हां हां म्हणतां नांवारूपाला चढलों असतों.

**गजरा :** पुरे झालं, तुमचं आपलं कांहीं तरीच.

**निराजी :** कांहीं तरीच कसें? कबजी नाहीं का बाईसाहेबांच्या जिवावर एकदम एवढे मोठे अमात्य झाले?

**गजरा :** कुणी ऐकलं तर विनाकरण फट् म्हणता ब्रह्महत्या व्हायची! थोरां-मोठ्यांच्या असल्या अंधारातल्या गोष्टी आपल्यासारख्या गोरगरिबांनीं बोलतां कामा नये.

**निराजी :** कबूल, पण थोरामोठ्यांची करणी करून आम्हां गोरगरिबांना वर यायला काय हरकत आहे? पहा बुवा, डाव खेळून पाहण्याजोगा आहे. तूं विचार कसला करते आहेस? तूं आपलें माझें ऐक. या डावांत दान तुझ्यासारखें पडलें नाहीं तर नांव बदलून देईन!—मग काय ठरलें?

**गजरा :** पाहतें प्रयत्न करून. पण मी मोठ्या पदाला चढल्यें तर तुम्ही देवडीवाले माझा हेवादावा नाहीं ना करणार?

**निराजी :** छे—छे, भलतेंच ! तूं मात्र महाराजांची राणी झाल्यावर या निराजी देवडीवाल्याला विसरूं नकोस. मला माझ्या पराक्रमावर नशीब काढतां आलें नाहीं तरी तुझ्या जिवावर मला काय करतां येणार नाहीं !

[ पडद्यांत--गजरे, अग गजरे, गुणीबाळ केव्हांचा उठून रडतो आहे; तूं तिकडे देवडीवर कसलें राज्य घेत बसली आहेस ? ]

**गजरा :** आल्यें बाईसाहेब, आल्यें मी. निराजी, मी जात्यें. पुन्हां भेटेन तुम्हांला. मग आपण बोलूं. [ जाते.

**निराजी :** राज्य घेत बसली आहे मराठ्यांचें. म्हणावें गजरा आतां संभाजी महाराजांची राणी व्हायला बसली आहे ! पोरगी मोठी रंगेल खरी ! म्हणूनच अशी हातोहात रंगली. हिचा वशिला माझ्या उपयोगी पडणार यांत संशय नाहीं. माझ्या जातकुळीचा पत्ता नाहीं म्हणून सेनासागर मला हिणवतो नव्हे ? बघ बेट्या म्हणावें, आतां मी कसा नांवारुपाला येतों ते ! आतां मी बांगड्यांच्या वशिल्यावर खासा शिपाईच काय, आज ना उद्यां मराठ्यांचा सेनासागरसुद्धां होईन. मग गजरा राणीसाहेब आणि मी सेनासागर ! जातकुळीचा पत्ता नाहीं म्हणे ! [ जातो.

**: : ३ : :**

[ रायगडावरील राजवाड्यांतील देवालय. **जोत्याजी** प्रवेश करतो. ]

**जोत्याजी :** ईश्वर करो आणि कबजींनीं आज योजिलेल्या कारस्थानाला यश न येवो. कबजींनीं आज मुद्दाम आईसाहेबांच्या देवपूजेच्या वेळीं महाराज आणि कमळजा यांची या देवालयांत पहिलीवहिली धूळभेट करून देण्याचें योजिलें आहे तें केवळ आईसाहेबांची अप्रतिष्ठा करण्यासाठींच होय हें का मला कळत नाहीं ? कबजींचे हे एकापेक्षां एक वरचढ दुष्टाव्याचे कावे पाहून असा सर्वांगाचा तिळपापड होतो, कीं आईसाहेबांना डसायला टपून बसलेल्या त्या विंचवाला असें टांचेखालीं तुडवून ठार करावें. पण तो विंचू सांबाच्या पिंडीवर चढून बसला आहे. त्याला लाथ हाणावी तर ती सांबाला लागणार ! म्हणून नाईलाज होतो. आईसाहेब देवपूजेसाठीं वाड्यांतून बाहेर पडल्या कीं, ताबडतोब खबर देण्याची कामगिरी कबजींनीं मला सांगितली आहे. बरें झालें, कीं त्यांनीं मलाच ही कामगिरी सांगितली. मी तसाच घाईघाईनें आईसाहेबांपाशीं आलों आणि आज देवपूजा आटोपून घेण्याची घाई केली. पण आईसाहेब अजून कशा बरें आल्या नाहींत ?

[ **येसूबाई** प्रवेश करते. ]

**येसूबाई :** जोत्याजी, माझं एक काम करतां का? असे याच पावलीं बागेंत जा आणि तुळशीवृंदावनापाशीं कबजींच्या दासीबरोबर कोण सुंदर मुलगी बोलत बसली आहे तेवढं पाहून या.

**जोत्याजी :** आज्ञा आईसाहेब! [ जातो.

**येसूबाई :** (स्वगत) ती लावण्यवती मुलगी कोण बरं असावी ? आणि त्या दासीनं खुणावलं तेव्हां माझ्याकडे पाहून ती कां बरं हंसली ? चेहऱ्यावरून तर ती कुणातरी खानदानी मराठ्याची लेंक असावीसं वाटतं. एरव्हीं कांहीं नाहीं, ती कबजींच्या दासीबरोबर बोलत बसली आहे म्हणून येऊं नये तो संशय मनांत येतो.

> **दाहि दारुणा ही भ्रांति मना। न कळे कां हांसे उपहासें ती ललना ॥ध्रु०॥ परम दयाळा ! तव पदिं प्रार्थी। न शिवो भ्रांति नृपमना ॥१॥**

[ **जोत्याजी** खिन्न वदनानें प्रवेश करतो. ] जोत्याजी, तपास केलात का?

**जोत्याजी :** आईसाहेब, ती कुणी का असेना ! आपणाला तिच्याशीं काय करायचें आहे? आपण चटकन् देवपूजा आटोपून घ्या कशी.

**येसूबाई :** नव्हे—मी देवपूजा आटोपून घेत्यें; पण मघांशी मी येतांना ती मुलगी माझ्याकडे पाहून हंसली म्हणून आपली सहज चौकशी करायला सांगितली.

**जोत्याजी :** ती आपणाकडे पाहून हंसली?

**येसूबाई :** होय, म्हणून आपलं सहज विचारलं. ती कां हंसली तें कांहीं मला कळलं नाहीं. खरंच जोत्याजी, ती कां हंसली असेल हो?

**जोत्याजी :** (स्वगत) इतकी ती पोरटी बेमुरवतखोर आहे काय? महाराजांची भेट होण्यापूर्वीच जर तिचा इतका दिमाख तर ही उद्यां राणी झाल्यावर पाणी जाळील. मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात ते हे असे! पण आईसाहेबांच्या कानीं ही अमंगळ वार्ता न जाईल तेवढी बरी. (उघड) आईसाहेब, ती गंगाजी फर्जंदाची मुलगी कमळजा आहे.

**येसूबाई :** कोण? फर्जंदाची कमळजा-महाराजांची बालमैत्रीण कमळजा!

**जोत्याजी :** होय आईसाहेब.

**येसूबाई : खरंच का?** मग मला शंका आली ती उगीचच म्हणायची! हें मला अगोदर कळलं असतं तर मी तेव्हांच तिचा कुशल समाचार घेतला असता. जोत्याजी,

तुम्हांला पुन्हा थोडं काम सांगतें. तुम्ही तिला इकडे बोलावून आणाल का? आणि हें पहा, तिला कोण बोलावतं आहे म्हणून सांगाल? राणीसाहेब बोलावताहेत असं सांगू नका, तुझी वहिनी तुला बोलावते आहे असं सांगा. म्हणजे ती चट्कन् येईल. जा.

**जोत्याजी** : (स्वगत) आतां काय बोलूं कर्म माझें! (उघड) आईसाहेब, कमळजा आपणाला वहिनी म्हणायला आलेली नसून आपली सवत व्हायला आलेली आहे. आपणाला पट्टराणिपदावरून दूर लोटून स्वतः पट्टराणी होण्यासाठीं आलेली ती आपली दावेदारीण आहे!

**येसूबाई** : छे, छेः! जोत्याजी, काय बोलतां हें तुम्हीं! असल्या बोलण्यानं महाराजांना दोष लागतो आणि तिलाही लागतो. मी म्हणतें, कमळजा पट्टराणी झाली तर बिघडलं कुठं? खरंच, ती महाराजांची पट्टराणी होईल तर फार चांगल होईल. तरूणपणाला मनासारखी संसारसुखाची जोड नसली, कीं पुरुषाचं मन चंचल बनून भलत्या वाटेला झुकण्याचा फार संभव असतो. त्यांतून सामान्य माणसाची गोष्ट निराळी आणि महाराजांची गोष्ट निराळी. सामान्य माणसाचं मन बहकलं तर त्याचा एकट्याचा संसार मोडील; पण महाराजांचं मन कोणत्याही कारणानं संसारातून निघून भलत्या वाटेला सैरावैरा धांवूं लागलं तर उभ्या महाराष्ट्राचा उन्हाळा करून सोडील म्हणून म्हणतें, महाराजांची आवडती कमळजा महाराजांची पट्टराणी झाली तर देवच पावला! खरोखर तुम्हीं ही शुभवार्ता माझ्या कानीं घातली. तुमच्या तोंडीं साखर पडो! [ देवघरांत जाते.

**जोत्याजी** : ( स्वगत ) किती थोर मन हें! पतीनें नुसतें आपलेपणाच्या ओढीनें एखाद्या परस्त्रीकडे पाहिले तरीदेखील बायकांच्या अंगाचा तिळपापड होतो. पग इथें सवत प्रत्यक्ष मुळावर येऊन बसली तरीदेखील तो भेदभाव या साध्वीच्या ध्यानीं-मनींहीं नाहीं.—महाराज, विश्वव्यापी प्रेमानें मूर्तिमंत नटलेल्या या देवतेच्या सहवासांत इतकें आयुष्य घालवूनही आपणाला तिची ओळख पटूं नये, हे आपलें दुर्भाग्य होय!

**येसूबाई** : आज विद्याधर देवपूजेचं साहित्य ठेवायला विसरला वाटतं! कोण आहेरे तिकडे—विद्याधर, अरे विद्याधर! मला देवपूजेचं साहित्य पाहिजे आहे!

**जोत्याजी** : काय, पूजेचें साहित्य ठेवलें नाहीं? कबजीचें कारस्थान देवघरापर्यंत येऊन

पोहोंचले कीं काय ? विद्याधर, ए विद्याधर ! ( विद्याधर प्रवेश करतो. ) विद्याधर, आज तूं आईसाहेबांना पूजेचें साहित्य कां ठेवलें नाहींस ?

**विद्याधर :** जोत्याजी, आजपासून पूजेचे साहित्य ठेवायचें नाहीं असा मला कब्जींचा सक्त हुकूम आहे ! मी तरी काय करूं ? माझा नाइलाज आहे. मी रोज पूजेचें साहित्य ठेवीत नव्हतों कां ?

**जोत्याजी :** कब्जींचा हुकूम ! म्हणे कब्जींचा हुकूम ! हरामखोरा, महाराजांना जर हा प्रकार कळला तर कब्जी राहतील बाजूला आणि तुला मात्र मरणाच्या मोलानें या चुकीची भरपाई करावी लागेल, माहीत आहे ?

**येसूबाई :** कां उगीच त्याला बोलतां जोत्याजी ! कब्जींचा तसा हुकूम असल्या-वर त्याचा काय इलाज ? विद्याधर, तुझा यांत कांहीं दोष नाहीं बरं ! तूं आपला जा. मला आज देवपूजेला फुलं नसलीं तरी चालतील. मी देवाला नुसतं हळद-कुंकूच वाहीन. [ विद्याधर जातो. ] जोत्याजी, तुम्हांला मी काय सांगितलं ? तुम्ही जातां कीं मी जाऊं ?

**जोत्याजी :** मी जातों आईसाहेब !

**येसूबाई :** पण हें पहा, हा प्रकार महाराजांच्या कानीं जातां कामा नये बरं ! तुमचा स्वभाव फार तापट आहे म्हणून मुद्दाम सांगून ठेवतें. महाराजांच्या मनाला नसता त्रास होईल; आणि त्या दोघांच्या जिव्हाळ्याच्या मैत्रींत बिघाड आणल्याचं पातक नाहक माझ्या माथीं बसेल, म्हणून सांगून ठेवतें. ( देवघरांत जाते. )

**जोत्याजी :** ( स्वगत ) हर हर ! एकूण कब्जींच्या कारवाईची मजल इथवर गेली अं ! एवढया धनंतर मराठी साम्राज्याची माता-माऊली स्वतःच्या राजवाड्यांत पूजेला लागणाऱ्या मूठभर तुळशी-फुलांनाही महाग व्हावी ! महाराजांना जर हा प्रकार कळला तर आपली कवडी किंमत होईल हें कब्जींना माहीत नाहीं !

( जातो. )

**येसूबाई :** एकूण आज कब्जींनीं आणखी एका पावलानं पुढचा पल्ला गांठला म्हणायचा ! पण मीं कब्जींना तरी दोष कां द्यावा ? माझंच दैव ! मला आज देव-पूजा अंतरायची होती, त्यासारखी त्यांना बुद्धि झाली. परमेश्वर कब्जींच्या कुडीचा आसरा करून माझ्या पूर्वजन्मार्जित पापांची ही सव्याज फेड तर करून घेत नसेल ना ? पण छे ! मी चुकतें आहे. परमेश्वर कनवाळूंचाही कनवाळू आहे, पर्वता-सारख्या पापराशी पदरीं असलेल्या पापिष्टांना देखील तो क्षमा करतो. तो

माझ्यापुरताच इतका निष्ठुर कसा होईल! परमेश्वराची प्रत्येक मूर्तामूर्त कृति सत्य-शिव-सुंदर अशा त्रिविध मांगल्यानं नटलेली असते. तें मांगल्य अनुभवायचा अधिकार माणसानं विवेकानं साध्य केला कीं त्याला हा ब्रम्हाण्डाचा जगड्व्याळ पसारा मांगल्यमय दिसूं लागतो. विवेकानं मनाला जी शांति प्राप्त होते तिचं मोल त्रिभुवनाच्या मोलानंही मापतां यायचं नाहीं. विवेकानं पावन झालेलं माझं मन मला आतां धीर देऊन सांगूं लागलं आहे,—येसू, या नश्वरतेनं नटलेल्या जगांतील ऐहिक जीवनार्थकलहाचं आकांडतांडव पाहून तूं कष्टी होऊं नकोस. जगाच्या जन्मापासून आजपर्यंतचा काळाचा महिमादेखील हेंच सांगतो.

**प्रभु जगतीं नटला हा शुभकर। परम-सुखाशा उपजवि जीवा;**
**वणवण फिरवी सारी धरणी ॥ ध्रु० ॥ सुखसविता रुचिरा निज कांति**
**उजळी संकटतिमिरा वारुनि ॥ १ ॥**

[ **जोत्याजी** प्रवेश करतो ]

**जोत्याजी :** आईसाहेब, कमळजा आपल्या भेटीला यायला तयार नाहीं.

**येसूबाई :** असं कसं झालं? तुम्हीं तिला कांहीं अधिकउणं बोलून दुखवलं असेल.—

**जोत्याजी :** नाहीं आईसाहेब! मी आपल्या आज्ञेबाहेर एक अक्षरही बोललों नाहीं. पाहिजे तर राणोजी शिर्के तिथें होते, कमळजेचा भाऊ तानाजीही तिथें होता, ते देखील सांगतील. त्यांची देखील इच्छा प्रथम तिनें आपल्या भेटीला यावें अशीच होती. पण कबजींकडून निरोप घेऊन त्यांचा पिराजी हुजऱ्या तिथें आला; त्यानें सांगितलें कीं, 'उगवत्या महाराणीनें मावळत्या महाराणीला भेटायला जातां कामा नये'!

**येसूबाई :** तेंही खरंच आहे. कमळजेला भेटीला बोलावण्यांत माझीच चूक झाली. आतां मीच स्वतः जाऊन तिची भेट घेतें, म्हणजे गैरसमज दूर होईल. [ जाते.

**जोत्याजी :** ( स्वगत ) मनाचीं खरीं थोर माणसें फलभारानें वांकलेल्या आम्रवृक्षाप्रमाणें सदाच नम्र असतात. पण आईसाहेबांच्या अंगीं वसणाऱ्या पृथ्वीच्या मोलाच्या या गुणांचें महाराजांपाशीं चीज होऊं नये ना! शत्रूविषयीं देखील मनांत इतका आदर बाळगून अपकारांची फेड उपकारांनीं करणाऱ्या या माउलीविषयीं देवा, तुला तरी दयेचा पाझर कसारे फुटत नाहीं! पण या निमित्तानें कां होईना, आईसाहेब एकदांच्या इथून लौकर निघून गेल्या हें फार चांगलें झालें. त्यांची अप्रतिष्ठा होण्याचा प्रसंग निदान आजच्यापुरता तरी टळला. आतां कबजीकडे जाऊन खबर द्यावी,

कीं आईसाहेब अगोदरच देवपूजा आटोपून गेल्या, ते पहा, कबजी म्हणतांच कबजी हजर ! आणि हा बरोबर कोण ? संताजी ! अरे हे दोघेही इकडेच येत आहेत वाटतें ! आपण जरा बाजूला राहून यांचें खलबत ऐकावें तर खरें ! आणि अखेर पुढें जाऊन कबजींना भेटावें म्हणजे एक हेलपाटा वांचला. [ बाजूला जातो.

[ **कलुषा व संताजी** प्रवेश करतात. ]

**कलुषा :** काय म्हणालास ? राणोजी शिर्का आला आहे ?

**संताजी :** होय, त्याला मी आत्तांच कमळजेशीं बोलतांना पाहिलें.

**कलुषा :** राणोजी शिर्का आला आहे ? आमच्या हातून दुखावला गेलेला हा जहरी सर्प दावा साधायला तर आला नसेल ?

**संताजी :** पण सरकार त्याची एवढी काळजी करण्याचें कारण आतां उरलें नाहीं !

**कलुषा :** तें कसें काय ?

**संताजी :** राणोजीनें महाराजांशीं आणि आपणाशीं असलेला जुना वैरभाव विसरून यापुढें मनोभावानें राजवटीची सेवा करण्याचें ठरविलें आहे.

**कलुषा :** ( स्वगत ) असें आहे काय ? एकूण राणोजी फितूर झाला म्हणायचा ! मला माझ्या वाटेत हा कांटा नको होता. बादशहाला कळवून याचा बंदोबस्त करावा का. कीं हा फितुर आहे असें महाराजांच्या मनांत भरवून तसा परस्पर कांट्यानें कांटा काढावा ? पण छे ! तूर्त असें कांहींच करतां कामा नये. या दोघांना प्रथम आपलेसें करून घेणेंच अवश्य आहे. ( उघड ) बरं संताजी, तूं आतां एक कर. असाच महाराजांकडे जाऊन त्यांना लौकर मंडळींच्या भेटीला यायला सांग, आणि त्यांना म्हणावें, राणोजी शिर्का आला आहे, तो आज आपल्या भेटीला येणार आहे. तानाजप्रमाणेंच त्यालाही आजच्या मुहूर्तावर गौरवपूर्वक वश करून घेणें अवश्य आहे. त्यांना मिंधें केल्याशिवाय आपला पुढील कार्यभाग साधावा तसा साधायचा नाहीं; असें त्यांना मीं सांगितलें आहे असें सांग.

> **गमत मज न दुजा मार्ग बरवा । मम नृपकांता फसवाया ॥ ध्रु० ॥**
> **पाहुनि पतिपरनारिचरणि रत । बहुत खेद सति मनी करील ।**
> **सवतहि तिजला जलीं बवील ॥ १ ॥**

**ओत्याजी :** ( स्वगत ) केसानें गळा कापण्याची कला कबजींना अवगत आहे, असें म्हणतात ती ही अशी ! ठीक आहे.

**संताजी :** बरें. घेऊं आतां आपली आज्ञा ?

**कलुषा :** होय. पण कायरे संताजी ! महाराज कमळजेला भेटायला अगदीं अधीर झाले, असतील नाहीं !

**संताजी :** हें काय विचारावें सरकार. भेटीची वेळ कळविण्यासाठीं मी राजवाड्यांत गेलो तेव्हां तर महाराजांनीं विचारावें, कीं भेटीची वेळ इतकी उशिरा कां ठेवली ? आणि जोत्याजी तेव्हां तिथें होता त्याच्याशीं देखील महाराज हेंच बोलत होते.

**कलुषा :** मी म्हणतों तें हेंच. महाराजांना हा पोंच कधीं येणार, न कळे ! राजवाड्यापासून चावडीपर्यंत बारीकसारीक गोष्टींचा देखील बोभाटा होतो तो असा ! जोत्याजी तो काय, आणि महाराज असल्या यःकश्चित् हुजऱ्याशीं असली नाजुक हितगुजें करतात तीं काय ! अशानें आपल्या मोठ्या नांवाला नामोषी लागते हें महाराजांना कळत कसें नाहीं ! बरें संताजी, तूं लौकर जाऊन सांगितलेली कामगिरी कर.

**संताजी :** आज्ञा सरकार ! ( मुजरा करून जातो. )

( **पिराजी** प्रवेश करतो. )

**कलुषा :** काय रे !

**पिराजी :** ( मुजरा करून ) चिटणीस वाड्यांत आपल्या भेटीसाठीं आले आहेत.

**कलुषा :** चिटणिसांना म्हणावें, मी सध्यां एका महत्वाच्या राजकारणांत गुंतलों आहे. तूर्त भेट होणें नाहीं.

**पिराजी :** सरकार, अतिशय निकडीचें काम आहे. आपली भेट लौकर झालीच पाहिजे असें चिटणीस म्हणाले.

**कलुषा :** बेशरम ! पुन्हां वर तोंड करून बोलतोस, तुला एकदां सांगितलें ना ? चालता हो अगोदर.

**पिराजी :** आज्ञा सरकार ! ( स्वगत ) एकूण मीं जे मर्म शोधून काढलें तेंच खरें. माझ्या हातीं बांगड्या असत्या तर सरळ गोष्टींतही यांच्या शिव्या खायचा प्रसंग माझ्यावर कशाला येता. तें कांहीं नाहीं. बांगड्यांचा वशिला पाहिजेच. ( जातो. )

**कलुषा :** खरेंच, विद्याधरानें आपली कामगिरी बजाविली कीं नाहीं, अगोदर चौकशी केली पाहिजे. या गोष्टींत केवळ नोकरचाकरांवर विसंबून उपयोगी नाहीं. नव्या राणीच्या अमदानीची चुणूक जुन्या राणीला आजपासून मिळालीच पाहिजे. विद्याधर, अरे विद्याधर, ( आंत जातो. )

**जोत्याजी :** ( पुढें येऊन ) ह्याच महत्वाच्या राजकारणांत राजेश्री गुंतले आहेत! आणि हें राजकारण इतकें थोर, इतकें महत्वाचें कीं यःकश्चित हुजऱ्यापाशीं याचीं वाच्यता केल्यानें यांच्या मोठ्या नांवाला नामोषी लागते! असल्या हरामजाद्या गळेकापूंनीं दिवसाढवळया खुशाल आपल्या कारस्थानाची तात त्या भोळ्या शंकराच्या मानेला लावावी आणि आम्ही ती उघडया डोळ्यानीं निमूटपणें पहावी. पण कबजी म्हणाले तें अक्षरशः खरें आहे. मी एक यःकश्चित् हुजऱ्या आहे. यांच्या-सारख्या नादानाला महाराजांनी अमात्य केलें—दारींचीं वाहाण देव्हाऱ्यांत बसविली आणि तिच्या भजनीं लागले. आतां मी यःकश्चित् हुजऱ्या कोणत्या तोंडानें बोलूं, कीं महाराज हा रस्ता चुकतो आहे, म्हणून !

**कलुषा :** ( प्रवेश करून ) कोण जोत्याजी !

**जोत्याजी :** सरकार मी आपलीच वाट पहात होतो.

**कलुषा :** तुला सांगितलेली कामगिरी बजावण्यांत तूं कसूर केलीस !

**जोत्याजी :** नाहीं सरकार ! मीं कसूर केली नाहीं. पण आईसाहेबांपुढें माझा नाइलाज झाला. मी आज लौकर देवपूजा करणार असा त्यांनीं हेकाच धरल्यावर तिथें माझें यःकश्चित् हुजऱ्याचें काय चालणार ! पण त्यांतल्यात्यांत एक बरें झालें. आईसाहेबांची देवपूजा कांहीं सिद्धीला गेली नाहीं.

**कलुषा :** असें ! ती कां बरें ?

**जोत्याजी :** त्यांना आज पूजेचें साहित्यच मिळालें नाहीं.

**कलुषा :**असें का ? हा पुजारी ब्राह्मण मोठा ऐदी आहे. त्याला ताकीद देऊन ठेवायला हवी. ( स्वगत ) हा फसलेला डाव पुन्हा साधला तर पाहूं. ( उघड ) बरें, तूं आतां असें कर राणीसाहेबांना जाऊन सांग कीं, आत्तां महाराज देवदर्शनाला यायचे आहेत; (नौबत झडूं लागते,ती ऐकून) ही पहा,नौबत झडूं लागली. महाराजांची स्वारी इकडे यायला निघाली. तूं राणीसाहेबांच्याकडे जाऊन त्यांना सांग, कीं आज उभयतांनीं जोडीनें देवपूजा करावी असें महाराजांच्या मनांत आहे. त्यासाठीं तुम्हांला आलें पाहिजे. महाराजांची आज्ञा आहे म्हणून सांग ! त्यांना म्हणावें, महाराज आल्यावर सूचना द्यायला माणूस येईलच; पण तुम्ही तयार रहा. जा लौकर. मी महाराजांना सामोरा जातों. जा.

**जोत्याजी :** अरे चांडाळा ! अखेर असा डाव साधलास काय ? आज जोडीनें देवपूजा करण्याची कुटिल कल्पना यानेंच महाराजांच्या मनांत भरवून दिली

असली पाहिजे. एरवीं महाराजांना आजकाल आपण होऊन असली कल्पना सुचणेंच शक्य नाहीं. यांत आईसाहेबांची अप्रतिष्ठा होणार हें उघड दिसतें आहे. पण ही महाराजांची आज्ञा ! तिचा अंमल झालाच पाहिजे !

[ **तानाजी** आणि **राणोजी** प्रवेश करितात. ]

**तानाजी :** ( रागानें ) महाराजांच्या इभ्रतीला कलंक आहे हा ! कमळजेला वाईट वाटेल म्हणून तिच्यादेखत मी बोललों नाहीं; पण खरेंच सांगतों तुम्हाला राणूबाबा, मला महाराजांचा हा थिल्लरपणा मुळींच पसंत नाहीं. आधीं मुळीं महाराजांना आमच्या भेटीला यायची गरजच काय होती ?

**राणोजी :** भल्या माणसा ! ते आमच्या भेटीला येत नसून, कमळजेच्या भेटीला येत आहेत !

**तानाजी :** म्हणूनच मी बोलतों आहे. मला येऊं नये ती शंका येते आहे ती त्या-मुळेंच ! मी म्हणतों, कमळजेला अग्निब्राह्मणाच्या साक्षीनें राजाची राणी व्हायला अजून अवकाश आहे. तोंवर तिनें महाराजांच्या वर्तनाविषयींचा बोभाटा ध्यानीं घेतां चार पावलें दूर रहाणेंच इष्ट नाहीं का ?

**राणोजी :** मग सांगावें तसें महाराजांना.

**तानाजी :** सांगावें खरें, पण कोणी आणि कसें ! महाराजांनीं तर कमळजेला राहा-ण्यासाठीं स्वतंत्र रंगमहाल नेमूनदेखील टाकला ! मला हीं कांहीं एकंदर बऱ्याचीं चिन्हें दिसत नाहींत !

**राया मोहुनी गेला। बघून ललना, क्षणांत चळला, भारी ॥ ध्रु० ॥**
**वाटे भीति मना; मोह नाशकारी ॥ १ ॥**

[ **कमळजा** आणि **गजरा** प्रवेश करतात. ]

**कमळजा :** काय चाललं आहे ? दादा राणूबाबाना बाजूला घेऊन काय चाललं आहे ?

**राणोजी :** कांहीं नाहीं, ( स्वगत ) ह्या बहीण भावंडांमधील मतभेद पुढे माझ्या चांगलेच पथ्यावर पडणार यांत संशय नाहीं.

**कमळजा :** कांहीं नाहीं कसं ? मी ओळखलं ! तुझा सारा रोंख महाराजांच्या भेटीला घेण्यावर आहे. पण दादा, महाराज आपला राजेपणाचा अभिमान सोडून आम्हां गरिबांच्या भेटीला येत आहेत हा त्यांचा थोरपणा आहे. आपण त्यांच्या खुल्या दिलाचा असा कडू अर्थ घेणं बरं नव्हें. ( पडद्यांत शिंग वाजतें; नौबदी झडतात. ) अगबाई ! महाराज अगदीं जवळ आले ! दादा, मी तुझ्या पायां पडतें. ह्या पहिल्यावहिल्या

भेटीची धूळमाती मात्र करूं नकोस ! ( देवीला नमस्कार करून ) आई भवानी, ह्या भेटींत बखेडा उत्पन्न करण्याची दुर्बुद्धि दादाला सुचूं देऊं नकोस आणि सुखसंतोषानं भेटीचा समारंभ पार पाड म्हणजे मी तुझीं खणानारळानं ओटी भरीन.

**गजरा :** हें ग काय ? उद्यां तूं राणी होणार अन् मग तुला काय कमी आहे ? चांगली भरजरी पैठणी नेसवीन म्हण कीं.

**कमळजा :** बरं; भरजरी पैठणी नेसवीन. (पडद्यांत संभाजीमहाराजांची ललकारणी.) अगबाई ! आलेच वाटतं महाराज !

[ **संभाजी**, **कलुषा**, त्यांच्यामागें हातांत दोन तरवारी घेऊन **संताजी**,
भालदार-चोपदार, छत्रचामरें घेतलेले सेवक प्रवेश करतात.
संभाजी देवदर्शनाला जातांना कमळजेकडे पाहून हंसतो.
कमळजा लाजून हंसत खालीं पाहूं लागते. ]

**गजरा :** कमळजे, कोण ग तुझ्याकडं पहात होतं ?

**कमळजा :** आतां जरा गप्प बसायला काय ग घेशील ?

[ संभाजी देवदर्शन करून माघारा फिरतांच कमळजा पदरांतील फुलं त्याच्या
मस्तकावर उधळून नमस्कार करते व दूर उभी रहाते ]

**राणोजी :** महाराज, आपल्या पायाचा हा पिढीजात सेवक, राणोजी शिर्का, आपणांला मुजरा करतो आहे.

**तानाजी :** महाराज, हा आपला बाळपणींचा खेळगडी तानाजी फर्जंद आपल्याला मुजरा करतो आहे.

**कमळजा :** ( स्वगत ) मला भय वाटत होतं, दादा नीट वागतो कीं नाहीं म्हणून ! बरं झालं बाई ! आई भवानी, तूं नवसाला पावलीस !

**संभाजी :** ( उच्चासनावर बसून ) तानाजी, राणोजी, बसा. ( कबजी त्या दोघांना संभाजीच्या डाव्या बाजूला मांडलेल्या उच्चासनांवर बसवतो. व स्वतः संभाजीच्या उजव्या हाताला बसतो. भालदार-चोपदार वगैरे मंडळी मागें उभी राहातात. ) राणोजी, तुझी इकडे आल्याची शुभवार्ता मला कबजींनीं मुद्दाम माणूस पाठवून कळविली. ती ऐकून मला मनापासून संतोष झाला.

**कलुषा :** राणोजी, झाल्यागेल्या गोष्टी मनांत न ठेवतां पुन्हां महाराजांच्या पायापाशीं आले, हें त्यांनीं शिर्क्यांच्या नेकजातपणाला साजेसेंच वर्तन केलें !

**संभाजी :** यांत काय संशय, राणोजी, शिर्क्यांचें कूळ आणि सर्पाचें कूळ दोन्ही सारखींच असेंच आजवर मी समजत आलों. तुम्ही शिर्क्यांनीं सर्पाप्रमाणें मनांत माझ्याविषयीं डाव धरला आहे हें मला माहीत आहे. मी शिर्क्यांचा सह्याद्रीएवढा घोर अपराध केला आहे खरा! ती गोष्ट रागाच्या व उतावळे-पणाच्या भरांत होऊन गेली. तो डाव मनांत धरून आम्हांला डसायला टपून बसलेला एक जातिवंत सर्प आज माझ्या माथीं कृपेची सांवली धरीत आहे. राणोजी, सर्पाच्या सांवलीनें भणंगाचाही भूपाल होतो. मग तुमची कृपेची सांवली या तुमच्या भूपालाची भाग्यरेषा उजळती कां करणार नाहीं?—

> **शुभ हा भाग्यभानु उदयास जणु येई । करि अनल सुमराजि; विभुची कृपा ही ॥ धृ० ॥ शुभ ह्या समयिं आज विसरोनि गत वैर । सहकारि हो सांच मज सौख्यकारी ॥ १ ॥**

शिर्क्यांच्या शिरोमणे! ये, या तुझ्या राजाला आपल्या पराक्रमाचें पाठबळ देऊन धन्य कर! ( राणोजीला आलिंगन देतो. )

**कमळजा :** पण राणूबाबा झाले तरी माझ्यामुळेंच महाराजांना लाभले. देवाला सोडून देव्हाऱ्याला भजायची ही बाई कुठली रीत!

**संभाजी :** तुम्हीं तर आमच्या मर्दांनीं बाण्यावरही मात करण्याची कला उपजत शिकून आला आहांत! तानाजी, ही तुझी बहीण जशी बुद्धीनें तशीच जिभेनें फार म्हणजे फारच तिखट! तुला माहीतच आहे! ही लहान होती तेव्हां थोरल्या आबासाहेबांसमोर बोलतांना जिथें मी मी म्हणणाऱ्या बहाद्दरांचीं मनें भेदरायचीं तिथें ही चिमुरडी पोरगी पढवलेल्या मैनेसारखी अंगच्या हूडपणानें बोल बोल बोलावयाची!

**कमळजा :** हो, आणि म्हणूनच तिला खिजवूखिजवून अशी अबोलती करायची! पण मी मुळीं आतां बोलायचीच नाहीं. पुरुषांची जात बायका भित्र्या असतात हें ओळखून त्यांना जेव्हां तेव्हां बोलूं नये तें बोलून भेदरून सोडते. मला लहानपणापासूनचा अनुभव आहे बरं, पण चारचौघांत असं करणं हा कांहीं पुरुषार्थ नव्हे! मी मुळी बोलायचीच नाहीं आतां! चल ग गजरे आपण आपल्या आंत जाऊं. [ दोघीही देवळांत जातात.

**संभाजी :** त्यांचा रुसवा मग आम्ही काढूं! तोंवर गौर रुसून बसूं द्या. तानाजी, तूं माझा बाळमित्र. माझ्या हातून घडलेल्या आगळकी विसरून तूं पुन्हा आपल्या

मायघरीं आलास; फार समाधान वाटलें आजच्या या शुभमुहूर्ताची आठवण म्हणून मी तुम्हां दोघांही वीरांचा यथोचित सन्मान करणार आहें. कबजी, आजपासून तानाजीला पंचहजारी आणि राणोजीला सप्तहजारी सहीशिक्यानिशीं करून द्या ! तसेंच त्यांच्या जप्त झालेल्या वडिलार्जित दौलतींही आजमितीच्या उत्पन्नासह त्यांना आदा करा. ( कबजी संताजीच्या हातून एक तरवार घेऊन पुढें करतो. ) तानाजी, तुझ्या तारुण्यांतील वीरतेजाला शोभा देण्याजोगी देणगी म्हणून ही विजया मी तुला अर्पण करतों. ( तानाजीच्या कमरेला तरवार बांधतो. )

**तानाजी :** ( मुजरा करून ) महाराजांनीं आपल्या कृपाकटाक्षांच्या वर्षावानें न्हाणलेली ही काया उभा जन्म महाराजांच्या सेवेंत अखंड वाहिलेली राहो ! वीराचा खरा संसार म्हणजे त्याच्या हातांतील तळपणाऱ्या तरवारीची वीरोचित जोपासना होय; हें मी कधींच विसरणार नाहीं, याला महाराजांचें पायच साक्ष आहेत.

**संभाजी :** शाबास-तानाजी, शाबास ! तूं खरा नरवीर तानाजी मालुसऱ्याचें नांव नुसते सांगणार नाहींस, नांव गाजवशील ! राणोजी, तुम्ही तर मुरलेले मर्द गडी. तुम्हांला माझ्यासारख्या गुडघ्याएवढ्या मुलानें मर्दपणाच्या गोष्टी काय सांगायच्या कबजी ती बिजली इकडे द्या पाहूं ! ( कलुषा संताजीच्या हातांतील दुसरी तरवार घेऊन पुढें करतो. ती घेऊन ) राणोजी, मागच्या आवतांत तुमची दौलत खालसा केली गेली तेव्हा ही तुमची बिजली हातीं लागली. तिच्या साह्यानें तुम्ही गनिमांची मुंडीं हरघडीं लोळविलीं आहेत ! अशी ही तुमची प्यार बिजली आज मी तुम्हाला अर्पण करतों ! ( तरवार राणोजीच्या कबरेला बांधतो. )

**राणोजी :** ( मुजरा करून ) महाराजांचा मी अत्यंत आभारी आहें ! ( स्वगत ) याच बिजलीला मी महाराजांचें रक्त पाजून शिर्काणाचा सूड घेईन हीच माझी प्रतिज्ञा !

**संभाजी :** कबजी, तुम्ही या दोघांनाहीं प्रथम थोरल्या आबासाहेबांच्या परमपूज्य समाधीचें दर्शन घेऊन तसेंच दरबारांत घेऊन या !

**कलुषा :** आज्ञा सरकार. [ जातो.

[ तानाजी व राणोजी त्याच्या मागोमाग जातात.

**संभाजी :** ( भालदार-चोपदार वगैरे मंडळीना ) आजच्या या आनंदाच्या दिवसा-

प्रीत्यर्थ तुमची कबजी योग्य ती संभावना करतील. तुम्हांला आतां रजा देण्यांत येत आहे. [ सर्वजण मुजरा करून जातात.

**गजरा :** कमळजे, नव्हे राणीसाहेब, आतां कांहीं आपणांला निराळया पाठराखणीची गरज नाहीं ! मी आपली जातें. [ जाते.

**संभाजी :** ( देवघरातून तिच्या हाताला धरून बाहेर आणून ) कमळजे, हें काय, ओसुद्धां द्यायचो नाहीं ! इतका रुसवा ! बाकी हा रुसवाही तुला शोभतो. कांट्यांवांचून गुलाब नाहीं. रुसव्यावांचून रंग नाहीं ! ( हनुवटीस हात लावतो.)

**कमळजा :** मला सारं समजलं. आपण मला कशीतरी एकदांची बोलती करणार आहांत. पण झांकल्या डोळ्यांनीं गुलाबाला हात घातला, तर फूल हातीं येण्यापूर्वी त्याचे कांटे मात्र हाताला बोचतात !

**संभाजी :** अजूनही तूं रुसलेलीच ? कमळजे, आजच्या प्रसंगीं खरें पाहिलें तर रुसायचा पहिला मान आमचा आहे !

**कमळजा :** रायगडचे राजे रुसायला कधींपासून लागले ? रुसतात बायका. पुरुषांनीं रुसायचं नाहीं; पुरुषांनीं रागवायचं.

**संभाजी :** बरें, तसें कां होईना ! पण रागवायचा पहिला मान तरी आमचा आहे ना?

**कमळजा :** बाळपणापासूनच राग आपल्या नाकावर आहे ! पण हा कांहीं खरा राग नव्हे. मला माहीत आहे, माझा रुसवा काढण्यासाठीं आपण हें रागाचं उसनं अवसान आणतां आहां. हें अवसान आपण कुठून आणीत आहां तें मला माहित आहे! पण मी आपणाला नमस्कार करतांना फुलं फेंकलीं ती आपली थट्टा करण्यासाठीं कांहीं फेंकलीं नाहींत. प्रथमदर्शनींच मनोभावानं आपली पूजा करावी म्हणून मुद्दाम बागेंतून आपलीं आवडतीं फुलं तोडून आणलीं तीं आपणाला अर्पण केलीं.

**संभाजी :** कमळजे, तूं उपजतच मनकवडेपणांत पटाईत आहेस खरी ! पण तुझा हा होरा मात्र सपशेल चुकला !

**कमळजा :** मग काय आपण रागावलां नाहींत ?

**संभाजी :** नाहीं कसा ? रागावलों ! पण तूं म्हणालीस त्यासाठीं नाहीं रागावलों.

**कमळजा :** तर कशासाठीं रागावलां ?

**संभाजी :** अशासाठीं रागावलों,कीं फुलें फेंकून मारलीस तीं आणखी कां नाहीं मारलीस?

**कमळजा :** अस्स ! अस्सं !-उपवर तरुणीचे पाय लागले, कीं अशोकाला फुलं

फुलतात असं मी ऐकलं आहे. त्यांतलंच हें एक नवीन कोडं ! हें बाई सोडवायचं कसं कोण जाणे !

**संभाजी** : हें असं सोडवायचें ! कमळजे, मीं या धनंतर मराठी स्वराज्याचा राजा खरा; पण या वेळीं त्या राजेपणाला रजा देऊन मी तुझा बाळपणाचा खेळगडी बनलो आहे. जिवाच्या जिवलगांनीं जिव्हाळ्यानं बोलायचें तर मध्यें परक्या जीवांचा आडपडदा नसलेला चांगला. एवढ्यासाठीं तुला मी इतका वेळ अबोल्याच्या पडद्या-आड ठेवली होतीं. केवळ जरूर तेवढा एकान्त तुझ्याशीं बोलायला सांपडावा म्हणून मी इतर मंडळींची हातोहात कशी बोळवण केली तें तूं आतांच पाहिलें आहेस. ती मंडळी गेली तिच्याबरोबर ते राजेही गेले. आतां तुझ्याशीं बोलतो आहे तो तुझा बाळपणाचा शंभू राजा ! कमळजे, बाळपणीं तूं माझ्याशीं अरे-तुरे बोलत असस तें तुला आठवतें का ?

**कमळजा** : हो. तेंच काय, पण बाळपणाच्या दुसऱ्याही किती एक आठवणी मला आठवतात.

**संभाजी** : त्या कोणत्या सांग बरें ?

**कमळजा** : त्या आपणाला आतां नाहींच आठवायच्या ! मग तीच तेवढी आठवण कशाला काढली बरं ? विसरायचं तर बाळपणचं सारंच विसरायचं आहे कबूल ?

**संभाजी** : नाहीं कबूल !

**कमळजा** : तर मग बाळपणीं दिलेली सारीं वचनं आज कृतींत उतरून दाखवायची. आपण तीं खुशीनं कृतींत उतरून दाखवायला तयार आहां असं माझ्या कानीं आलं आहे. पण प्रत्यक्ष आपल्या तोंडांतून ऐकल्याशिवाय माझं समाधान व्हायचं नाहीं. ती वचनं खरीं करून दाखवायचं आपल्याला आहे कबूल ?

**संभाजी** : आहे कबूल, म्हणून तुला मुद्दाम रायगडीं आणवून राजवाड्यांत ठेवली; आणि तुझी पहिली भेट या शुभस्थानीं घेत आहे.

**कमळजा** : खरोखरच का मी एवढी भाग्यवान् आहे ? महाराज, माझ्या अंतरंगां-तली गोष्ट जी आजवर मी कोणाशींही बोललें नाहीं ती आपणापाशीं बोलतें. होईन तर रायगडच्या शंभू छत्रपतींची राणी होईन; नाहींपेक्षां आजन्म अविवाहित राहीन असा माझा पण होता. म्हणूनच मी आजवर अविवाहित राहिलें. बाबांनीं व दादानं अन्य ठिकाणीं माझं लग्न जुळविण्याची अगदीं शिकस्त केली, पण परमेश्वर माझा पाठीराखा म्हणून. पुढं काय बोलावं बाई हेच मला सुचत नाहीं ! पण महाराज, मी

आपणाला एक विचारणार आहे. विचारूं कां ?

**संभाजी :** मी सांगितलें तेवढ्यानें समजूत पटली नाहीं वाटतें ? आणखी काय विचारायचें बाकी आहे ?

**कमळजा :** रागावणार नसाल तर विचारतें. इथं तिसरं माणूस असतं तर कांहीं विचारलं नसतं.

**संभाजी :** एकूण नवराबायकोनीं ऐकण्याजोगीच गोष्ट तूं विचारणार आहेस. मग ती ऐकायला मला राग कसा येईल ?

**कमळजा :** तसं नव्हे महाराज, माणसाच्या हातून तरुणपणांत कधींकधीं अविचार घडतो आणि मागाहून पश्चाताप करण्याची पाळी येते. तशांत पुरुषांची गोष्ट निराळी आणि स्त्रियांची गोष्ट निराळी. अब्रू हाच आम्हां स्त्रीजातीचा जिवंतपणा होय. मी सदैव आपल्या सहवासांत रहावं हा आपला मानस मी ओळखला आहे.

**संभाजी :** तशी तूं आहेसच चतुर ! ( तिच्या गळ्यांत हात घालून हातानें हनुवटी हालवतो.)

**कमळजा :** ( चटकन् मागें सरून ) पण गडे, रागावणार नसाल तर सांगते. माझ्या मनावर आपण आपल्या आणि माझ्या बाळपणापासूनच सत्ता गाजवीत आहां. तितकीच सत्ता माझीहि आपणावर आहे पण आपण लौकिकांत माझ्यावर आपली सत्ता सांगायची ती अग्निब्राह्मणांच्या व देवब्रह्मधर्माच्या साक्षीनं सांगायला नको का ? ( स्वगत ) आतां स्वारींचं मन कळेल.

**संभाजी :** कमळजे, मीं मनांतून देवाधर्मांना व अग्निब्राह्मणांना साक्षी ठेवूनच तुला माझी राणी करीन असें वचन दिलें आहे. मात्र राजकारणाच्या निकडीच्या भानगडीमुळें आपलें लग्न लांबणीवर पडणार तिथें नाइलाज आहे. कमळजे, देव, धर्म, अग्नि व ब्राह्मण हे जनासाठीं आहेत. पण वधूवरांच्या वाणींत सत्यतेचा जिवंतपणा असेल तर शास्त्र–मंत्रांच्या प्रशस्तिपत्रासाठीं त्यांनीं अडून बसलेंच पाहिजे असें नाहीं. श्रीरामांनीं चंद्रसेनेला वरण्याचा वर दिला तो कृष्णावतारीं पुरा केला.

**कमळजा :** तसाच आपणही आपला पण योग्य वेळीं जनांत खरा करून दाखवाल अशी आतां या दासीची खात्री झाली आहे. म्हणूनच महाराज, ही आपली दासी आपणाला माळ घालीत आहे. ( माळ घालते )

**सुमति मनमोहना तूं । वचनिं वरुनि तुज सुखविन खचितचि**
**नाथ मी तव गुणवती ॥ ध्रु० ॥ ईशसाक्ष भूपति हा अर्पण करी**
**तव पदिं तन–मन–धन प्रियसखि ! ॥ १ ॥**

**संभाजी :** अहाहा ! माझी वासना ह्या मंगलसमयीं सफल झाली ! ( आपल्या गळ्यांतील अर्धी माळ कमळजेच्या गळ्यांत घालून ) ह्या माळेनें आपणां उभयतांचें जीव संलग्न केलें. मी आई भवानीला साक्षी ठेऊन सांगतों, आजपासून कमळजा, महाराष्ट्राच्या शंभू राजाची राणी झाली.

( **येसूबाई** हातांत पूजेचें साहित्य घेऊन प्रवेश करते. **जोत्याजी** तिच्या मागोमाग असतो. कमळजा व संभाजी एकदम दूर होतात. माळ तुटते. )

**संभाजी :** राणीसाहेबांना या वेळीं इकडे येण्याचें काय कारण ?

**कमळजा :** राणीसाहेब, मी मघांशीं तुमच्या भेटीला आलें नाहीं त्याचा असा सूड घेतलात काय ? ( जाते. )

**येसूबाई :** ( हात जोडून ) मी चुकलें, न कळत पाहुण्यांची अमर्यादा झाली, मला क्षमा असावी.

**जोत्याजी :** शेवटीं कबजींनीं आपला दुष्टाव्याचा कावा असा साधला !

( पडदा पडतो. )

## २

[ रायगडावरील राजवाड्याला लागून असलेली तुळसीवृन्दावनाची बाग.
**तानाजी** एकटाच तेथील पुष्करिणीवर बसला आहे. ]

**तानाजी :** अखेर राणूबाबांचें भविष्यच खरें झालें. जो उठला तो आतां मला हिणवूं लागला आहे ! कमळजा ही महाराजांची राख आणि तानाजी त्या राखेचा भाऊ ! महाराजांकडून कमळजेला मागणी आली तेव्हां मला किती हुरूप वाटला, कीं माझी बहीण आतां रायगडची राणी होणार ! ती महाराजांची राणी होण्याऐवजी राख होऊन बसली ! कुठें राणी आणि कुठें रखेली ! महाराजांनीं पहिल्याच दिवशीं एवढी मोठी मनसबदारी दिली ती मला माझ्या बहिणीचें मोल म्हणूनच दिली असेल का !

**केविं कुलटा कुलीं जन्मली लाज त्यजि । भोळा खरा भूप भाळे**
**तिजासि आजि ॥ ध्रु० ॥ पितरां नरकिं घोर लोटी स्वयें जी । अनिवार**
**उभवोनि निज पापराशी । ग्रासी निशाकालें विश्वा तिमिर जेविं ।**
**कुलटा कुली जन्मली ॥ १ ॥**

[ **गजरा** प्रवेश करते ]

**गजरा :** तानाजीराव !

**तानाजी :** कोण आहे ?

**गजरा :** आज थोरल्या आबासाहेबांच्या समाधीच्या दर्शनाला महाराजांची स्वारी निघावयाची आहे. बरोबर राणीसाहेबदेखील जाणार आहेत. तुम्हीदेखील दरबारी पोशाखांत स्वारीबरोबर हजर असावें अशी महाराजांचीं आज्ञा आहे; आणि, राणीसाहेबांचीही तशी इच्छा आहे.

**तानाजी :** आणि त्या स्वारीत मी येऊन मिरवूं ? कमळजेला म्हणावें, तूं महाराजांची राख आणि मी त्या राखेचा भाऊ हें एवढ्या तीन महिन्यांत सर्वत्र महशूर होऊन चुकलें आहे ! तें आणखी स्वारींत मिरवून जगजाहीर करण्याचें कारण आतां मुळींच उरलें नाहीं !

**गजरा :** हें पहा, सरळ बोलावयाचं असलं तर बोला, नाहींपेक्षां असलं गैरबांका बोलावयाचं असलं तर तें राणीसाहेबांपाशीं जाऊन बोला; पाहिजे तर महाराजांपाशीं जाऊन बोला ! मी काय राणीसाहेबांच्या हुकमाची दासी ! मला अशा कोंपरखळ्या मारून काय होणार ! मी राणीसाहेबांचे देखील कधीं बोलून घेतलं नाहीं, तें तुमचें बोलून घ्यायला अडलंय माझं खेटर ! थांबा. मीच राणीसाहेबांना जाऊन सांगत्यें. [जाते.

**तानाजी :** ( आवेशानें उठून ) हरामजादी, ढालगज ! पण हिच्यावर रागावण्यांत तरी काय अर्थ ? जशी धनीण तशी तिची दासी. हरहर ! कमळजे, सारें जग तुला महाराजांची रखेली म्हणून ओळखीत असतां महाराजांबरोबर हत्तीवरून जगजाहीरपणें मिरवण्यापर्यंत तुझ्या निर्लज्जपणाची मजल गेली अं ! पण करंट्या पोरी, तूं आपल्या वर्तनानें जिथें महाराजांची रखेली म्हणून जगाच्या ओळखीची झालीस तिथें तूं हत्तीवरूनच काय, पण इंद्राचा ऐरावत आणून त्यावरून मिरवलीस तरी तुला राणी म्हणून कोण ओळखणार ! राक्षसिणी, तूं आपल्या या बदकरणीनें फर्जंदांच्या पाक कुळाला आपल्या नापाकपणाचा वज्रलेप डाग लावलास ! आतां हा डाग कसा पुसला जाईल ! परमेश्वरा, फर्जंदांचें खानदानी कुलशील ठार झालें ! त्या त्या मर्तिकाची साक्ष देण्यासाठीं तेवत असलेली ही साडेतीन हात उंचीची बोलती-चालती समई कधीं मालवली जाईल ! ( कपाळाला हात लावतो. )

[ **राणोजी** प्रवेश करतो. ]

**राणोजी :** तानाजी !

**तानाजी :** कोण, राणूबाबा ? तुम्ही अगदीं वेळेवर आलां मला या वेळीं तुमची भेट व्हायला हवीच होती.

**राणोजी :** तुझ्यासारख्या राजशालकांना माझ्यासारख्या सामान्य सरदाराची भेट घेण्याची इतकी गरज आजच बरी भासली !

**तानाजी :** राणूबाबा, तुमच्या पायां पडतों मला दुसरी कोणतीही शिवी द्या; पण राजशालक म्हणूं नका. त्या अमंगळ शिवीच्या सुरीचा वार माझ्या जिव्हारीं झोंबतो आहे.

**राणोजी :** कां बरें ? त्यांत एवढें जिव्हारीं झोंबण्याजोगें काय आहे ? आज कमळजा महाराजांबरोबर हत्तीवरून मिरवत समाधीच्या दर्शनाला जाणार. आजपासून ती संभाजीराजांची पट्टराणी झाल्याचें सरकारीरीत्या जगजाहीर होणार !– मग तूं जग-जाहीरपणें राजशालक ठरणारच !

**तानाजी:** राजशालक ! राणूबाबा, मी कसला राजशालक ! कमळजा महाराजांची राख आणि मी तिचा कपाळकरंटा भाऊ ! मला पुनः पुन्हा राजशालक, राजशालक, म्हणून माझ्या दुःखावर डागण्या कां बरें देतां ?

**राणोजी :** एकूण कमळजा राणी नसून राख होणार आहे, हे माझे आरंभींचे बोल तुझ्या प्रचीतीला उतरले म्हणायचे !

**तानाजी :** होय, उतरले खरे !

**राणोजी :** बराच लौकर शहाणा झालास तूं एकूण !

**तानाजी :** होय. शहाणा झालों खरा; पण फार उशिरा शहाणा झालों. ठेंच लागल्यानंतर हें शहाणपण मला सुचतें आहे. आतां त्याचा काय उपयोग! राणूबाबा, या लाजिरवाण्या परिस्थितीतून पाय बाहेर काढायचा एखादा मार्ग आहे का हो ?

**राणोजी :** तें ज्याचें त्यानें पहावें.

**तानाजी :** राणूबाबा, असें मला लेंकराला दूर लोटूं नका. तुम्हांला पाहतांच मला जरा धीर आला. मला मार्ग दाखविण्यासाठींच परमेश्वरानें या ऐन वेळीं तुम्हांला पाठवून दिलें असें मला वाटलें.

**राणोजी :** मी आलों आहे तो निराळ्याच कामासाठीं आलों आहे. आज मला कांहीं जरुरीच्या कामासाठीं मोगलाईत जाणें भाग आहे. हें कुठें बोलायचें नाहीं. तूं आपला म्हणून तुला सांगतां आहे. गंगाजीला एखादा निरोपबिरोप कळवायचा आहे का ? कारण मी तिकडे गेल्यावर गंगाजी साहजिकपणेंच माझ्यापाशीं तुम्हां लेंकरांची चौकशी करणार.

**तानाजी :** बाबांना निरोप कसला कर्माचा सांगूं ! बाबांना जर हा प्रकार कळला

तर त्यांच्या मनाची काय स्या होईल याची तुम्हांलाही कल्पना आहेच.

**राणोजी :** आणि तुलाही कल्पना आहेच. खरोखर, कमळजा राणी होण्यासाठीं आली ती राजाची रखेली होऊन बसली हें मी गंगाजीला कोणत्या तोंडानें सांगावें असें मला होऊन गेलें आहे ! यांत नामुष्की जशी तुम्हांला आहे, तशीच मी तुमच्या जिव्हाळ्याचा हितकर्ता म्हणून मलाही आहे.

**तानाजी :** म्हणूनच विचारतों, या पापाचें परिमार्जन करण्याचा एखादा मार्ग मला सुचवाल तर मोठे उपकार होतील !

**राणोजी :** (स्वगत) राजांच्या नाशाची एखादी मसलत या वेळीं याला सुचविली तर ती त्याला अगदींच रुचणार नाहीं असें नाहीं. (उघड) सदिच्छेनें उपाय शोधूं लागल्यावर उपाय सांपडणार नाहीं असें थोडेंच आहे ! उपाय मी सुचवूं शकेन; आणि तो तुला रुचला तर उलट तूंच माझ्यावर उपकार केल्यासारखें होईल. कारण जी तुमची इभ्रत तीच माझी.

**तानाजी :** आतां कसे लाखाचे बोल बोललां ! बोला--याला उपाय कोणता, तें बोला.

**राणोजी :** ( दूर पाहून ) हा जोत्याजी नेमका याच वेळीं इकडे कशाला आला ? तानाजी, चल आपण बाहेर जाऊं; म्हणजे आपणाला काय मसलत करायची ती मोकळ्या मनानें करतां येईल. [जातात.

[ **जोत्याजी** प्रवेश करतो. ]

**जोत्याजी :** वाचेनें बोलूं नये ते बोल बोलण्याचें वांट्याला येणार या भयानें जीभ अडखळूं लागली आहे. कमळजा राणी होण्यासाठीं आली ती राख होऊनही राणीपेक्षां डोईजड होऊन बसली ! हा आईसाहेबांचा झाला एवढा छळ त्या कृष्ण-कर्म्या कबजीला पुरेसा वाटला नाहीं, म्हणून राजलक्ष्मीच्या वस्त्रालंकारांनें त्या राखेला राणीप्रमाणें नटवून राणीच्या तोलानें स्वत:बरोबर नेण्याचा बदसल्ला त्यानें महाराजांच्या मनांत भरवून दिली असावी. मराठ्यांच्या राजलक्ष्मीची ही विटंबना भगवंता, तुला तरी सहन होईल का रे !

[ **येसूबाई** तुळशीच्या पूजेचें साहित्य घेऊन प्रवेश करते. ]

**येसूबाई :** जोत्याजी, आज सकाळपासून तुम्ही आलांच नाहीं, मी तुमची केव्हांची वाट पहात होतें. मला तुमच्याशीं बरेंच कांहीं बोलायचं आहे. तुम्हांला सवड आहे ना ?

**जोत्याजी :** हें काय विचारणें आईसाहेब ! आपल्या पायांच्या सेवेंत विकल्या गेलेल्या सत्तेच्या सेवकांशीं आपण इतकी मिनतवारीची भाषा कां बरें काढली !

**येसूबाई :** तसं नव्हे ! तुम्ही कांहीं तुमच्या स्वाधीनचे नाही. महाराजांची-कबजींची मर्जी संभाळून तुम्हांला तरी वागावं लागतं हे मला माहीत आहे, म्हणून विचारलं, आतां आहे ना घटकाभर सवड तुम्हांला ?

[ **गजरा** प्रवेश करते. ]

**गजरा :** जोत्याजी, हें काय ? महाराजांनीं तुम्हांला केव्हांच सांगितलं यांच्याकडून महाराणींचे नवे वस्त्रालंकार मागून आणायला, तरी तुम्ही इथेंच शिळोप्याच्या गोष्टी बोलत बसला आहांत. आतां इतक्यांत मिरवणुकीची वेळ होईल. महाराजांचा हुजऱ्या येऊन सांगूनदेखील गेला लौकर तयारी करायला. आतां तुम्ही वस्त्रालंकार आणून देणार तरी केव्हां आणि राणीसाहेबांनीं तो सारा शृंगारसाज ल्यायचा केव्हां? उशीर झाला तर महाराजांना तुमचं नांव सांगेन बरं ! आपली वेळींच बजावून ठेवतें ! [ जाते

**येसूबाई :** जोत्याजी, आज कसली हो मिरवणूक निघायची आहे ?

**जोत्याजी :** ( हात जोडून ) आईसाहेब, महाराजांची आपणाला आज्ञा आहे,— महाराजांनीं राज्यारोहणाच्या प्रसंगीं आपणाला महाराणपिदाचा अभिषेक करतांना अर्पण केलेलें वस्त्रालंकार आपण कृपा करून माझ्यापाशीं द्या. ते मला आतांच्या आतां कमळजेकडे पोंचते केले पाहिजेत.

**येसूबाई :** बरं आहे, देतें. स्वतः महाराजांनींच ते मागितले आहेत ना पण ?

**जोत्याजी :** ( कपाळाला हात लावून ) होय आईसाहेब !

**येसूबाई :** मग असं कराल का ? माझ्या महालांत जा, आणि मोकळ्यावरच। चांदीचं तबक आहे--तें जसंच्या तसं घेऊन जिकडे पोंचवायचे असेल तिकडे पोंचवून या. पण काम आटोपतांच इकडे या बरं ! मी तुमच्यासाठीं थांबतें. [ जोत्याजी-जातो. ] थोरल्या आबासाहेबांनीं हिंदवी स्वराज्याची प्राणप्रतिष्ठा करून स्वतःला राज्याभिषेक करून घेतला, त्या शुभसमयीं श्रीसमर्थांनीं श्रींचा प्रसाद म्हणून महावस्त्र सासूबाईंच्या ओटींत घालून त्यांना आशीर्वाद दिला. तीं राजलक्ष्मीचीं अहेवपणींचीं लेणीं मी महाराज्ञी झालें तेव्हां माझ्या स्वाधीन करण्यात आली. त्याच वस्त्रालंकारांवर मला महाराज्ञिपदाचा मंत्राभिषेक झाला. त्यांना मूर्तिमंत

राजलक्ष्मी समजून मी रोज नित्यनेमानें शुचिर्भूतपणें त्यांची पूजा करीत आलें. त्या राजलक्ष्मींच्या पूजेला आजपासून मी अंतरणार काय ? [ पडद्यांत--' सर्व दासींनो ध्यानांत ठेवा कीं, आजपासून कमळजाबाईसाहेबांना राणीसाहेब म्हणायचं ! त्यांच्याखेरीज दुसऱ्या कुणालाही राणीसाहेब असं म्हणायचं नाहीं. कमळजा राणीसाहेबांची स्वारी आज महाराजांसह समाधीच्या दर्शनाला जाण्यासाठीं राज-वाड्यांतून बाहेर पडली, कीं सर्वजणींनीं त्यांना ओवाळायचं. मी कांहीं माझ्या पदरचं सांगत नाहीं; महाराजांच्या इच्छेवरून कबजींनीं केलेली आज्ञा सांगतें आहे!] काय ? आजपासून कमळजेला सर्वांनीं राणीसाहेब म्हणावं अशी महाराजांची इच्छा आहे ? म्हणूनच मला वाटतं, त्यांनीं महाराणीचे वस्त्रालंकार जोत्याजीमार्फत मागून घेऊन कमळजेकडे पाठविले असतील. कमळजा विधिपूर्वक महाराजांची महाराणी होण्यापूर्वी राजलक्ष्मींचीं लेणीं ल्याली म्हणून राजलक्ष्मी कोपून तिचं आयुष्य दुःख-मय तर करणार नाहीं ना ?

**करुणाकरा ! दीननाथा ! शांतवा हो सकल दुरिता ॥ ध्रु० ॥**
**न्याय सोडि नृप हा; करीं दयाळा ! त्याची क्षमा ! राखि आज राजमान्यता ॥ १ ॥**

[ **जोत्याजी** प्रवेश करतो ]

**येसूबाई :** जोत्याजी, तुम्हीं आतां इथून गेल्यापासून येऊं नये त्या अमंगळ शंका माझ्या मनांत येऊं लागल्या आहेत.

**जोत्याजी :** ही आमच्या भयाण भविष्यकाळाची भेसूर जाणीव भवितव्य या आम्हांला करून देत आहे.

**येसूबाई :** हें कळूनसवरूनदेखील तुम्हीं महाराजांना असा नव्हे असा हिताचा शब्द सांगितला नाहीं ! तुम्हांला मी म्हणते याचें कारण महाराजांना तुम्ही लहान-पणापासूनच कडिखांद्यावर खेळवलं आहे. महाराजांचं अजून, झालं तरीं बालपणच नाहीं का ? ते रस्ता चुकूं लागले तर त्यांना वडिलपणाच्या नात्यानं दोन हिताचे शब्द सांगून रस्त्यावर आणायचं काम तुमचं आहे.

**जोत्याजी :** गोष्ट खरी आहे. पण आईसाहेब, हा सेवाधर्म मोठा कठिण आहे. तुम्ही जाणतां, कीं हें काळया केसांचे पांढरे केस होईपावेतों हा थेरडा जगला तो राजांच्या जिवासाठीं; स्वतःच्या जिवासाठीं नव्हे. राजांच्या जिवासाठीं स्वतःच्या जिवाची रया करायचा वखत येऊन ठेपला तरीसुद्धां या जोत्याजीनं कधी जातें

पाऊल जोडलें नाहीं, कीं केसरकरांच्या कुळदेवतेच्या गळयांतलें राजनिष्ठेचें मंगळसूत्र तोडलें नाहीं !

**येसूबाई :** हो म्हणूनच तुम्हांपाशीं बोलायचं. थोरल्या आबासाहेबांच्या हयाती-पासूनचे तुम्ही आमचे वडिलधाऱ्यांचे आधार म्हणून मला झाली तरी तुमच्या-विषयीं एवढी आशा वाटते.

**जोत्याजी :** आईसाहेब, थोरल्या आबासाहेबांनीं माझ्या पिकल्या केसांचा मान इतका राखावा कीं, वेळीं वखतीं असें नव्हे असें बोललों तर माझा शब्द त्यांनीं वरचेवर झेलावा. सेवकाचा भला बोल आपण कसा ऐकावा असला दुर्बुद्धीचा अहं-भाव त्या महापुरुषाच्या मनाला कधीं शिवलादेखील नाहीं. पण आज तो मनु पालटला आहे. आज जग हजार तोंडांनीं बोलूं नये तें बोलत असतांही तीं तोंडे बंद करायला मला तोंड नाहींसें झालें आहे.

**येसुबाई :** जग बोलतं तेंही कांहीं केवळ खोटं नाहीं. तुमच्यापाशी म्हणून मी बोलत्यें, आपलाच दाम खोटा आहे हें कांहीं आम्हांला नाकबूल करतां यायचं नाहीं. पण तिकडे तरी भलबुरं सांगायचं कुणी ? जोत्याजी, तुम्ही पाहतांच कीं हें सारं पोरावळं आहे. ते झाले तरी लहान, मी झालें तरी लहान. तशातदेखील हें बरं आणि हें वाईट असं मी सांगेन म्हणावं तर माझा शब्द अलीकडे स्वारीला रुचेनासा झाला आहे. तशांत कबर्जीची संगत ही अशी ! ते स्वारीला भलतंच करायला सांगतात; आणि भोळ्या भावानं करूं नये तें करावयाचं होतं. वडील-पणानं एखाद्या वेड्यावांकड्या कृत्याबद्दल आम्हांला जाब विचारणारीं नात्याचीं वडील माणसं सारीं गेलीं. आतां तुम्हींच नको का आम्हांला संभाळून घ्यायला ?

**जोत्याजी :** तें सारें खरें ! पण आईसाहेब, जगाची रीतच अशी आहे, कीं जो दास तो दुबळा ! सत्ताधीशापुढें दुबळ्यांच्या बोलाला मातीचेंही मोल नसते ! आजच्या राजवटींत कबजींच्या हातीं सत्ता आहे, म्हणून त्यांच्या कसाबकरणीला कोटीच्या मापाचें मोल आहे. आज कबजींनीं महाराजांच्या नांवावर मनाला मानतील ते जुलूम-जबरदस्तीचे हुकूम करावे, आणि आम्हीं हुकमतीच्या बंद्यांनीं त्या हुकमतीची तामिली करतां करतां मरावें. त्यांतूनही मी मन घट्ट करून महाराजांना वेळीं अवेळीं सांगत असतों, कीं महाराज, हें चुकतं आहे. पण माझ्या-सारख्या हुकमतीच्या ताबेदाराचे भले बोलदेखील महाराजांना बुरेच वाटतात; तिथें मी तरी काय करूं !

**येसूबाई :** होय. तिथं तुम्ही तरी काय कराल! तेंही खरंच आहे. पण कायहो जोत्याजी, कमळजा जी इकडे येऊन महाराजांच्या पदरीं पडून फसल्यागत झाली आहे, ती त्या उभयतांची राजीखुषी आहे, कीं त्यांत आणखी दुसऱ्या कुणाची अक्कलहुषारी आहे?

**जोत्याजी :** आईसाहेब, यांत दोष कुणाला द्यायचा आणि कुणाला द्यायचा नाहीं हें सांगणें महाकर्म कठीण आहे. स्वतः महाराज तर नांवाप्रमाणेच भोळ्या शंभूचे अवतार आहेत.

**येसूबाई :** मग काय, कबजींचं यांत कांहीं राजकारस्थान असेल असं तुम्हांला वाटतं?

**जोत्याजी :** अल्बत्! कबजी हा औरंगजेब बादशहाचा हस्तक असावा आणि त्याला पुढें करून बादशहा मराठशाहीच्या नाशासाठीं महाराजांच्या सभोंवार चक्रव्यूह रचीत असावा. महाराज विलासविहारांच्या बाबतींत बरेच मनदुबळे आहेत हें कांहीं खोटें नाहीं. त्याचा फायदा घेऊन त्यांना व्यसनाधीनतेपायीं राज्यकारभाराविषयीं बेदरकार बनविण्याच्या कामीं बादशहानें कबजीसारख्या हलकट छाकट्याची योजना केली असावी असा मला मूळपासूनच संशय आहे, व तो दिवसेंदिवस अनुभवानें अधिकाधिक ठाम होतो आहे.

**येसूबाई :** असेल-तसंही असेल. पण मी म्हणतें, आपण शत्रूंना तरी दोष कां द्यावा? शत्रु कुणाला नसतात? शत्रु थोरल्या आबासाहेबांना देखील होते. पण त्यांनीं त्यांना वेळोवेळीं कसं पाणी पाजलं? त्यांच्या पावलावर पाऊल ठेवून चालायचं झालं असत तर घरात शत्रूंचा शिरकाव झालाच नसता!

**जोत्याजी :** (स्वगत) कसाईखान्यांत दाव्याला डांबून पडल्यामुळें मरणघटका मोजीत उभी असलेली गरीब गायत्रीही मरणाच्या भयानें जितकी झुरत नसेल तितकी ही महाराष्ट्राची माता मनांत झुरते आहे. हें पाहूनदेखील परमेश्वरा तुला दयेचा पाझर फुटूं नये ना!

**येसूबाई :** तुम्ही बोलत कां नाहीं जोत्याजी? खरं काय असेल तें मोकळ्या मनानं बोला. अगदीं भिऊं नका, अगदीं ओशाळें होऊं नका. कमळजा महाराणी होणार हें मला अगदीं पहिल्या दिवशीं तुम्हींच सांगितलें ना? तेंव्हां तरी मी नाराज झालें का? उलट मी आज समाधीला जाऊन महाराज आणि कमळजा यांना सुख लाभावं अशी प्रार्थना करणार आहें.

**जोत्याजी** : आतां काय बोलूं आईसाहेब! माझे आई, काय बोलूं ! बोलावें तर बोलूं नये तें बोलायचें कपाळी येतें. त्यापेक्षां परमेश्वरा, मला पाषाणाची जीभ कां रे दिली नाहींस !

**येसूबाई** : अस्सं. आतां कसं बोललांत? मी विचारलं त्याचं उत्तर दिलं नाहींत तरी बोललां त्यावरून काय बोलूं नये हें मला समजलं. पण जोत्याजी, त्यांत एवढं अडखळण्यासारखं काय आहे ! कमळजा खरोखरीच मोठी भाग्यवान आहे बिचारी ! भाग्यवंताचं भाग्य उदयाला आलं तर अभाग्यांनीं त्याचा खेद कां मानावा ?

**जोत्याजी** : अभागी कोण ! आपण अभागी? छत्रपति संभाजीमहाराजांची पट्टराणी अभागी ! अलम् मराठी दुनियेला मातेपेक्षांही पूज्य असणारी महाराष्ट्राची महाराणी अभागी ? आणि फर्जंदाच्या पाककुळाचें तोंड काळे करणारी ती कलावंतीण भाग्यवान् ? राणी दुर्दैवाच्या रानोमाळीं भटकायची आणि रांड राणी व्हायची ? छेः–छेः ! आईसाहेब, आपणासारख्यानीं असें अभद्र बोलूं नये. आपले भाग्य आपली पुण्याई फार थोर आहे ! समजा, महाराज आजच्यापेक्षांही जास्त चळले देवानें तें दिवस आणूं नयेत पण आणले-आणि आल्या अरिष्टांना मागच्या पावली मागें परतवून लावायला महाराजाचीं पुण्याई पुरी पडली नाहीं, तरी महाराजांच्या नांवाचें महाराणीपदाच्या लालीनें रंगलेले कुंकू ह्या भाग्यवंतविर ज्या देवानें कोरलें आहे त्याला त्याची लाज आहे. त्या देवाचें देवपण पणाला लावून मी प्रतिज्ञेवर सांगतो, महाराष्ट्राची महाराणी आपणच आहां आणि आपणच असणार ! रांड कधीं राणी होत नसते.

( **गजरा** प्रवेश करते. )

**येसूबाई** : गजरे, कशाला आलीस तूं यावेळीं इकडे ?

**गजरा** : इतकं रागवायला काय झालं बाईसाहेब ? मी कांहीं तुमची खलबतं ऐकायला आलें नाहीं. मी जोत्याजींना बोलवायला आलें आहे. आता तरी नाहीं ना झाला गुन्हा ?

**येसूबाई** : गुन्हा कसला त्यांत गजरे !

**गजरा** : एकदम रागाला आलात म्हणून सांगितलं.

**येसूबाई** : नाहीं बाई, मी मुळींच रागावलें नाहीं. तू मात्र रागावलीस !

**गजरा** : बरं मी रागावलें. महाराजांना सांगून माझं काय डोचकं मारायला लावायचं तें लावा !

**जोत्याजी :** ( स्वगत ) ह्या उद्दाम पोरटीचें थोबाड चांगलें रंगवूं का ? पण नको अतिप्रसंग आणायची ही वेळ नव्हे.

**गजरा :** जोत्याजी, राणीसाहेबांनी तुम्हांला बोलावलं आहे.

**जोत्याजी :** राणसाहेब तर या इथेंच आहेत.

**गजरा :** अस का ? बरं आहे, तुम्हांला कमळजा राणीसाहेबानीं बोलावले आहे, यायचं आहे कीं नाहीं ?

**जोत्याजी :** ( स्वगत ) ही शिवशंभूच्या गळ्याला विळखा घालून बसलेली नागीण दुखावली गेली तर केव्हां कशी डसेल याचा कांहीं नेम नाहीं, ऐकूं या तर खरं काय म्हणते ती ! ( उघड ) आईसाहेब, मी आतां इतक्यांत जाऊन येतों.

( जोत्याजी व गजरा जातात. )

**येसूबाई :** माझा उजवा डोळा एकाएकीं कां बरं लवूं लागला ? शकून अपशकून हे परमेश्वरी योगायोगाचे पडताळे असतात. छेः ! डोळा फारच लवतो आहे. आईभवानी, आज तूं मला आणखी कोणतं दिव्य करायला लावणार आहेस ?

**जगदंबिके ! तव मायापसारा । पाहोनी मतिमंद जन होय सारा । आशा-निराशा-रत जीव झाला । भवसागरामाजि ना ठाव त्याला ॥ ध्रु० ॥ देखोनि अबला असहाय बाला । कां दैवा ! तू छळ मांडियेला । ना आसरा जाण तुजवीण आतां । तव चरणिं माते ! मज देइ थारा ॥ १ ॥**

( **जोत्याजी** प्रवेश करतो. )

**जोत्याजी :** आईसाहेब, या क्षणी पाय उचला आणि आपल्या महालाकडे चालायला लागा.

**येसूबाई :** कां बरं ? इतकी घाई कसली ?

**जोत्याजी :** कमळजा राजलक्ष्मीचें वस्त्रालंकार लेऊन आपणाला लाजवण्यासाठीं मुद्दाम इकडे येते आहे.

**येसूबाई :** एवढंच ना? मग ती महाराणीच्या वेषांत कशी शोभते हें अनायासं मला पाहायला तरी मिळेल ? महाराजांच्या आवडीनिवडी मला माहीत आहेत. ती कांहीं चुकली असली तर मी तिला सांगून सुधरून घेईन.

**जोत्याजी :** (स्वगत) आतां काय करूं म्हणजे ही लक्ष्मी त्या आकाबाईच्या फेऱ्यापासून या वेळेपुरती तरी दूर राहील ! ( उघड ) आईसाहेब, माझें कांहीं जरूरीचें काम आहे म्हणून सांगतो. चट्कन् जरा महालाकडे चला.

**येसूबाई :** खरंच काम आहे का ? तर येतें.

( **गजरा** प्रवेश करून )

**गजरा :** बाईसाहेब, हें काय ? राणीसाहेब येत आहेत हें पाहून मुद्दाम त्यांना भेटायचं टाळण्यासाठीं निघून जातां वाटतं ! ( कमळजा महाराणीच्या वेषांत येते, तिला—) राणीसाहेब, आपण आलेल्या पाहून या मुद्दाम निघून जात होत्या.

**जोत्याजी :** ( स्वगत ) झाला-घात झाला !

**कमळजा :** येसूबाई, मला पाहून तिट्कार्‍यानं चाललां कीं काय ?

**जोत्याजी :** ( स्वगत ) काय येसूबाई ? राणीसाहेब नाहींतर नाहींच; पण येसूबाई-साहेबदेखील नाहीं ?

**येसूबाई :** नाहीं बाई, मीं तुम्हाला पाहिलं नाहीं.

**गजरा :** नाहीं कसं ? आतां तर पाहिलं ! आणि पाहून कसा पण घुस्सा केला !

**कमळजा :** काय, घुस्सा केला ?

**येसूबाई :** काय, मीं घुस्सा केला ?

**गजरा :** हो—हो, घुस्सा केला ! आपल तोंडच सांगेल केला कीं नाहीं तें.

**जोत्याजी :** ( स्वगत ) धनी पुरवतो पण धन्याचें कुत्रें पुरवत नाहीं तें असें !

**येसूबाई :** हद्द झाली बाई तुझ्यापुढं ? हा असा जेव्हां जेव्हां रजाचा गज आणि राईचा पर्वत होतो. असा प्रसंग होतांहोईतों येऊं नये म्हणून मी शक्य तितकी संभाळून वागतें.-कां राणीसाहेब, सहज भेटायला आलां होता ना ?

**कमळजा :** इतकं कांहीं मला हिणवायला नको, समजलं ना येसूबाई ? हीं टोमण्याची भाषा मला देखील बोलतां येतें. तुम्ही महाराणी आहांत,तुम्हांला आम्ही भेटायला यायचं आणि तुम्हीं आम्हांला भेटी द्यायच्या. पण लक्षांत ठेवा, तुमचं महाराणीपद आतां केवळ औट घटकाचं उरलं आहे. अळवाच्या पानावर पडलेल्या दहिंवराच्या थेंबाप्रमाणें तें सायंकाळच्या आत लयाला जाईल ? मी महाराणी होणार हें तुमच्या डोळ्यांत सलतं आहे. मला माहीत आहे. पण जिथं देव माझ्या नवसाला पावला आहे, तिथं देवस्थळ्याच्या जळफळाटाची मला काय किंमत आहे ! वर्षाचे बाराही मास कांहीं सारखे नसतात. आज देवाच्या माथीं दिमाखानं शोभ-णारी पुष्पवती उद्यां निर्माल्याच्या मोलानं उकिरड्यावर जाऊन पडलेली मीच पाहीन. ज्या देवानं ही वेळ दाखविली तो देव तीही वेळ दाखवील. असेल या कमळजेचं नशीब थोर तर आजच्या आज मी महाराष्ट्राची महाराणी झाल्याचं सान्य

जगाला जाहीर होईल. आणि या घडीला मला हिणवणारी ही नामधारी महाराणी आज सूर्यास्ताच्या आंत आपल्या पायांनीं या खऱ्याखुऱ्या महाराणीला मिनतवारीनं भेटायला येईल.—चल ग गजरे !

**यसूबाई :** बाई, माझे पापग्रहच बळावले आहेत, म्हणून तुम्हांला आणि तुमच्या दासीला देखील असे जिवाला झोंबणारे उणे बोल बोलायला सुचतात.

**गजरा :** दासी—दासी म्हणून मला उठल्या बसल्या कशाला हो हिणवतां ? दासी मी आहेंच. मी कुठं नाहीं म्हणतें ? पण मी तुमची मात्र दासी नाहीं. कमळजा महाराणीसाहेबांची आहे.

**येसूबाई :** हीं उणीं बोलणीं कानांनीं ऐकवत नाहींत. [ जाते

**जोत्याजी :** (स्वगत) समर्थांच्या श्वानाला मान द्यायचा तो किती द्यायचा ? (उघड) ए ढालगज अवदसे, जरा जीभ आंवरून बोल. जिना चढतांना पायाखालच्या पायऱ्या पाहून चढलें नाहीं तर तोंडघशी पडण्याची पाळी येते, समजलीस !

**कमळजा :** जोत्याजी, जोत्याच्या बैलोबांनीं कधीं इंद्राच्या ऐरावताशीं दावेदारी करूं नये.

**जोत्याजी :** आणि नंदनवनांतल्या नायकिणींनीही कधीं इंद्राची इंद्राणी होण्याची हांव धरूं नये. कमळजे, तूं मघांपासून कसकसे तारे तोडते आहेस तें मीं ऐकतो आहे. सेवाधर्म पडला व ज्याची सेवा करणें विधात्यानें नाशिबीं लिहिलें आहे तो देव असा दृष्टावला म्हणून तूं माझ्या देखत आईसाहेबांना मस्तवालपणानें बोलूं नयें तें बोलूनही मोकळी सुटलीस !

**कमळजा :** नाहींतर काय मला सुळी दिली असतीत ?

**गजरा :** तर ! पहा तरी राणीसाहेब !

**कमळजा :** तूं गप्प रहा ग !—जोत्याजी तूं मला ओळखलंस ?

**जोत्याजी :** ओळखलें-ओळखलें बरें ! तूं आतां बऱ्या बोलानें इथून जा. उगाच आगींत तेल ओतूं नकोस. माझ्या रागाची आग एकदां भडकली तर फुकट भाजून मरशील !–जा !

**कमळजा :** जोत्याजी, तुझ्या या उद्यांच्या महाराणीला तूं ओळखलोस ?

**जोत्याजी :** ओळखली-ओळखली ! राजांच्या रांडा कधी राजाच्या राण्या होत नसतात. जा, कर काळे येथून !

**कमळजा :** काय—काय म्हणतोस म्हातारड्या ? येसूबाई, तुझ्या कलानं हा कावळा आज इतका काव काव करतो आहे. तुझ्यापायीं आज मला यानं देऊं नये तसली

शिवी दिली आहे. तीच शिवी मी उलट तुला दिली असती; पण संबंध येतो संभाजीमहाराजांचा. पण येसूबाई, लक्षांत ठेव. महाराणीपदाच्या दिमाखानं भारावलेलं हें तुझं मस्तक मी माझ्या पायापाशीं नमवून हलकं करीन तरच फर्जंदांची लेक आणि महाराजांचीं महाराणी शोभेन. ( जातात. )

:: २ ::

( **निराजी** आणि **पिराजी** प्रवेश करतात )

**निराजी :** बस्स! सेनासागर मी होणार आणि गजरेला बायकोदेखील मींच करणार. जास्त बोलशील तर खबरदार !

**पिराजी :** पण जरा माझें ऐकून तर घेशील ? हें पहा, गजरेला वश करण्यांत तुझ्याप्रमाणेंच मीदेखील आटोकाट श्रम घेतो आहे हें खरें ना ?

**निराजी :** तू कसले श्रम घेतो आहेस ? सारे श्रम माझेच आहेत. ( तरवार उगारून ) खरें कीं खोटें, बोल !

**पिराजी :** बरें बाबा, कबूल ! गजरेला खूष करायच्या बाबतींत या घटकेपर्यंतचे सारे श्रम तुझे आहेत, आणि मी नुसता बघ्या आहे. आतां तरी झालं ?

**निराजी :** अस्सें ! आतां कसा शुद्धीवर आलास ! आतां तूं जसा अर्जुनाला धर्म तसा मला वडील भाऊ शोभतोस. माझ्या कर्तबगारीवर तुला आतां नशीब काढतां येईल.

**पिराजी :** मी धर्म आणि तूं अर्जुन. खरेंना पण हें ?

**निराजी :** अगदीं खरें.

**पिराजी :** तर मग प्रथम माझे हिताचे दोन शब्द ऐकून घे. पांचही पांडव एकजुटीनें वागले म्हणून भारतीय युद्धांत त्यांना कौरवांचा पराजय करून राज्य संपादन करता आलें हें तर तुला मान्य आहे ना ?

**निराजी :** अगदीं मान्य.

**पिराजी :** त्या पांच पांडवानीं गुण्यागोविंदानें एकजुटीनें नांदून भारतीय साम्राज्य मिळविलें. पांडवही मनुष्य होते आणि आम्हीही मनुष्येंच आहोंत. आम्ही देखील तसेंच एकजुटीने वागलों तर आम्हांलाही पांडवांप्रमाणेंच नशीब काढतां येईल.

**निराजी :** अगदीं बरोबर, पण पांडवांची इतकी एकी कशामुळें टिकली बरें ?

**पिराजी :** अरे बाबा, अर्जुनानें स्वयंवरांत जिंकलेली द्रौपदी पांच पांडवांची बायको झाली म्हणून !-- असा तारवटल्यासारखा चेहरा काय करतोस ! माझें नीट

ऐकून तर घे. अर्जुनानें जिंकलेली द्रौपदी पांच पांडवांची बायको झाली म्हणून ती पुढें भारतीय साम्राज्याची महाराणी आणि जगांतल्या पंचमहापतिव्रतापैकीं एक महापतिव्रता शोभली. आणि आम्ही तर काय, अवघे दोघेंच आहोंत. यावरून कांहीं धडा घेता आला तर पहा!—

**पिराजी :** पण इथें पटण्या न पटण्याचा प्रश्नच नाहीं. धाकट्या भावानें वडील भावाचें ऐकलेंच पाहिजे.

**निराजी :** हें पहा पिराजी, आपण समंजस माणसें आहों. आजकालच्या राजवटीत अधिकारासाठीं आपसांत झगडणाऱ्या कारभाऱ्यांप्रमाणें वागणें आपणाला कांहीं शोभत नाहीं. आपण सामोपचारानेंच हा प्रश्न सोडवला पाहिजे. मी म्हणतों, तुला कबजी-इतका तरी समंजसपणा दाखवायला काय हरकत आहे? कबजी बायकोच्या मोहांत वाजवीपेक्षां फाजील गुरफटून राहिले नाहींत म्हणून भिक्षुकाचे अमात्य झाले. तसा तूं गजरेचा मोह सोड; मग पांडव—कौरवांशीं झगडले तसे आपण राजवटीच्या कारभाऱ्याशीं लढूं. आपली एकी असल्यावर आपणाला राज्य मिळणारच. मग धर्मराजाप्रमाणें तुला मी आपल्या राज्याचा राजा करीन आणि मी तुझा आज्ञाधारक सेवक सेनासागरच राहीन. फक्त आज मी गजरेला हाताशीं धरून सेनासागर होईतों तूं माझ्या मार्गांत अडथळे आणू नकोस.

**पिराजी :** ( स्वगत ) आतां आपण यांतून तडजोडीचा मार्ग काढला पाहिजे, एरवीं कांहीं भागायचें नाहीं. गजरेला हाच घेईना का! ती मुलुखभवानी अष्टौ-प्रहर देवडीपासून राजवाड्यापर्यंत उंडारत रहाणार, तिच्या कुंकवाला धनी कुणीं व्हावें! तेवढ्यावर हा राजी झाला तर फार चांगलें झालें. मी एकदां सेनासागर झाल्यावर मग असल्या चटकचांदण्यांना काय दुष्काळ! (उघड) हें पहा निराजी, आपण आतां तडजोड करूं या. तूं गजरेला घे आणि मी सेनासागर होतों.

**निराजी :** पण तूं सेनासागर होऊन काय करणार? सेनासागराला लढाया माराव्या लागतात, तरवार मारावी लागते, सैन्यांतल्या शिपायांचीं मुंडकीं मारावीं लागतात,–प्रसंगीं प्राणही द्यावे लागतात; तेव्हां कुठें जय प्राप्त होतो! पण तूं तर असा भित्रा! तूं सेनासागर झाल्यानें आम्हांला जय मिळणार कसा आणि आपलें राज्य होणार कसें?

**पिराजी :** कसें!–मीदेखील अलीकडे दिवसेंदिवस शूर होऊं लागलों आहे. कबजींबरोबर शिकारींत जाऊन मी आतां बराच शूर बनलों आहे. मी आतां

वाघालादेखील मारूं शकतों, तो लढाईंत माणसांना कापायला भितों कीं काय! परवांची गोष्ट, कबजी महाराजांबरोबर शिकारीला गेले होते तेव्हां मीही बरोबर होतों. कबजींनीं एका वाघाला अडवून धरून त्याच्यावर गोळी झाडली!

**निराजी :** आणि मग तूं त्या मेलेल्या वाघावर वार केला असशील!

**पिराजी :** नाहीं. ऐक तर खरें! महाराज पुढें दुसऱ्या सावजाच्या पाळतीवर गेले. त्यांच्याबरोबर कबजीही गेले जातांना त्यांनीं मला सांगितलें धरलेला वाघ मारायला,–मीं एकट्यानें तो मारला.

**निराजी :** (स्वगत) कसा आहे राजश्रींचा कावा! पदरच्या पोपटपंचीनें 'ध' चा 'मा' करतो आहे! (उघड) त्यांनीं तुला काय सांगितलें?

**पिराजी :** नाहीं म्हटलें, मीं तो मारलेला वाघ एकट्यानें धरून बांधून आणला, कबजींनीं मुद्दाम मला शिकारींत बरोबर नेलें होतें!

**निराजी :** मुद्दाम शिकारीत नेलें होतें मारलेल्या जनावरांचे मुडदे उचलायला!

**पिराजी :** पण मी एकट्यानें मारलेला वाघ धरून बांधून आणला.

**निराजी :** बरोबर आहे. म्हणूनच तूं खासा मुडदेफरास शोभशील! पण सेनासागर कसा शोभशील?

**पिराजी :** मग तूं तरी कसा शोभशील? तूं तरी काय अशी तरवार गाजवली आहेस ते महाराज तुला एकदम मोठा मनसुभा देतील?

**निराजी :** नुसती तरवार गाजवून सेनासागरकी मिळाली असती तर कुणीही तरवारबहाद्दर सेनासागर झाला असता. त्याला मीच कशाला पाहिजे? आजकालच्या रंगेल राजवटींत तरवारीवर मुळींच भागेनासें होऊन बांगड्यांनीं तरवारींची जागा-पटकावली आहे! महाराज आहेत नव्या राणीसाहेबांच्या मुठींत, नव्या राणी-साहेब आहेत गजेरच्या मुठींत, आणि गजरा आहे माझ्या मुठींत! त्यांत आणखी ती माझी बायको झाली म्हणजे तर विचारायलाच नको. सांगा आतां पिराजीराव, मला मनसुभा मिळेल कीं नाहीं तें?

**पिराजी :** मनसुभा मिळेल; पण एकदम एवढा मिळण्याची जराशी पंचाईत वाटते. त्यापेक्षां देवडीवाल्याचा शिपाई, शिपायाचा बारगीर, बारगिराचा शिलेदार, शिलेदाराचा सेनासागर, असें पायरी पायरीनें—

**निराजी :** छे: छे: छे: छे: पिराजी, तुला कळत नाहीं! पायरी पायरीनें मनसुभा मिळविण्याचें काम नुसत्या तरवारबहाद्दराचें पण बांगड्यांची बहाद्दरी कांहीं और

आहे ! वेडया, नव्या राणसाहेबांच्याही हातीं बांगडया आहेत आणि गजरेच्याही हातीं बांगडया आहेत हें तूं विसरलास. महाराज आहेत नव्या राणसाहेबांच्या मुठींत, त्या आहेत गजरेच्या मुठींत, आणि गजरा आहे माझ्या मुठींत. सेनासागराला म्हणावें तुझ्या हातीं तरवार असली तर माझ्या हातीं बांगडया आहेत.

**पिराजी :** एकूण तूं गजरेला उपटून वर सेनासागरदेखील होणार म्हणतोस?

**निराजी :** अर्थात् !

**पिराजी :** हो बाबा ! पण मग माझी वाट काय ?

**निराजी :** अरे, मी आहे ना तुला ? इतका वेळ सांगतों आहे काय तर ! मी सेनासागर झालों रे झालों, कीं लगेच त्याच घटकेला तुला प्रथम खाशा सैन्यांतला शिपाई करून सोडीन.

**पिराजी :** ( स्वगत ) हा बांगडयांचा वशिला बोलतो आहे !

[ **गजरा** प्रवेश करते. ]

**गजरा :** (स्वगत) हें काय ? हे तर मेले अजून इथेंच उभे आहेत, अरे मेल्यांनो !

**निराजी :** मग काय सौदा पटला ना ?

**पिराजी :** हो ! पटला. न पटून चालणार कसें !-तूं प्रथम सेनासागर तर हो खरा ! मग तुझ्यामार्फत मीही गजरेचा वशिला लावीन !

**गजरा :** ( पुढें होऊन ) मीही गजरेचा वशिला लावीन ! पुरुषांसारखे पुरुष तुम्ही आणि गजरेचा वशिला लावीन म्हणे. माझ्यासारख्या बायकोमाणसाच्या जिवावर तुमच्यासारख्या पुरुषांनीं नशीब काढायचं त्यापेक्षां तुम्ही हातांत बांगडया कां नाहीं भरल्या ?

**पिराजी :** पुरुषांच्या जन्माला आलों म्हणून बांगडयांना मुकलों, आणि नशिबाचा नालायक ठरलों. हाच जर बायकांच्या जन्माला आलों असतों तर नशिबाला नांवें न ठेवतां नुसत्या नांवावरच नशीब काढलें असतें !

**निराजी :** म्हणूनच मीं तुला सांगितलें, धीरे धीरे देवडीवाल्याचा शिपाई, शिपायाचा बारगीर, बारगिराचा शिलेदार !-मी सेनासागर झालों, कीं तुला सैन्यांत बढती देत जाईन.

**गजरा :** वाहवा ! वाहवा ! हे जसें कांहीं आजच सेनासागर झाले आहेत !

**निराजी :** अग, झालों नाहीं होईन. तूं पाठीशीं घातल्यावर मला सेनासागर व्हायला कितीसा उशीर ?

**गजरा :** पण माझं बस्तान नीट एकदां बसूं दे तरी !

**निराजी :** म्हणजे ? तें अजून नाहींच का बसलें ?—मग माझ्या नशिबानें इथेंच बसकण मारली म्हणायची ! ( खालीं बसतो. )

**पिराजी :** बसा खालीं ! बसा खालीं ! सेनासागर, बसा खालीं !

**गजरा :** पण त्यांत इतकं कांहीं निराश व्हायला नको !

**निराजी :** निराश होऊं नको तर काय करूं ! तुझ्यासारख्या नखरेल बायकोची देखील जिथें अजून डाळ शिजेना, तिथें आम्हांला कोण कुत्रा विचारतो !

**गजरा :** आज नव्या महाराणीसाहेबांच्या नांवानं नगरांत द्वाही फिरली, कीं मग माझें बस्तान बसायला वेळ नाहीं. पण काय हो निराजी, मी आतां कशी दिसते ?

**निराजी :** सुंदर दिसतेस.

**गजरा :** नव्या राणीसाहेबांइतकी सुंदर ?

**पिराजी :** तितकी सुंदर दिसतेस.

**निराजी :** त्यांच्यापेक्षाही सुंदर दिसतेस ! तूं मिरवणुकींत नव्या राणीसाहेबांपाशीं बसलीस तर लोक तुलाच राणी म्हणतील, आणि राणीसाहेबांना तुझी दासी म्हणतील.

**गजरा :** एकूण मी नव्या राणीसाहेबांपेक्षां महाराजांना आवडेन म्हणायची !

**निराजी :** हो ! खास आवडशील. (स्वगत) म्हणजे ही माझ्या हातावर तुरी देणार कीं काय ?

**गजरा :** अगदीं सारे लोक माझ्या तोंडाकडे आशाळभुतासारखे पाहूं लागतील ?

**पिराजी :** खात्रीनें पाहूं लागतील.

**गजरा :** महाराजदेखील मला पाहून मोहींत होतील ! काहो निराजी !

**निराजी :** यांत काय संशय ! ( स्वगत ) ही बया मला कांहीं लाभेलसें दिसत नाहीं. (उघड) एकूण तूं महाराजांच्या मर्जीला उतरल्यावर आमचें काम होणार तर !

**गजरा :** मी आपला प्रयत्न करीन. मग पाहावें तुमच्या नशिबाचा कौल कसा पडतो तें.

**निराजी :** नाहीं–नाहीं. आजपासून आम्हांला नशीब बिशिब काहीं नाहीं. आमचें नशीब, आमची नामावळ, आमची नवखंडपृथ्वी, दहावीं काशी-गंगाभागीरथी-वाराणशी सर्व कांहीं तूं ! तूं देशील तो कौल आणि करशील तो सेनासागर.

**गजरा :** बरं आहे. मला आतां जाऊं दे. पण हें पहा, तुमच्याशीं मी इतक्या बरोबरीनं वागते हें कुठं बोलायचं नाहीं बरं! नाहीं तर लोक मला हंसतील; म्हणतील कीं, एखाद्या सामान्य कुळंबिणीसारखी ती यःकश्चित् देवडीवाल्याशीं दोस्ती ठेवते म्हणजे काय? घरांतल्या घरांत आपण कशींही वागलों, तरी कोण पहायला आलं आहे! पण चारचौघांत वागायचं म्हणजे पायांतल्या वाहणा पायांतच ठेवायला पाहिजेत. [ जाते.

**पिराजी :** कसें काय सेनासागर!

**निराजी :** ( स्वगत ) हा लेकाचा मला आतां असें हिणवूं लागला. ह्या हम्-रस्त्यावर माझी फजिती व्हायची आणि लोकांनीं हंसायचें, त्यापेक्षां इथून पाय काढावा हें चांगलें. ( उघड ) मला आतां वेळ नाहीं बोलायला. मला मिरवणूक पहायला जायचें आहे. [ जातो.

**पिराजी :** अहो, जरा थांबा! मींही मिरवणूक पहायला येतो आहे. पण म्हटलें, गजरा तुमची बायको होऊन तुम्हीं सेनासागर झाल्यावर तिच्या मार्फत माझा गरि-बाचा वाशिला थेटपावतों लावायला विसरूं नका! खाशी फजिती झाली गुलामाची! कसला सेनासागर आणि कसला शिपाई! कायसं म्हणतात ना, त्यांतली अवस्था. बाजार बसायच्या पूर्वीं उचल्याची घाई म्हणतात ती ही. पण गजरेच्या बाबतींत मात्र अगदीं सोळा आणे काम झालें ती मलाही नाहीं आणि त्यालाही नाहीं आतां ती महाराजांच्या मर्जींत जाऊन बसो नाहींतर एखाद्या महाराची बाईल होवो. आपणाला जी गोष्ट लाभत नाहीं, तिची एवढी फिकीर करा कशाला? आतां पुन्हा खाशा सैन्यांत शिरायचें, म्हणजे नवी विटी नवा दांडू नवा खेळ. पुन्हा ये रे माझ्या मागल्या!

## : : ३ : :

[ राजवाड्यांतील एक महाल **संभाजी** एकटाच विचार करीत बसला आहे. ]

**संभाजी :** कमळजेला महाराणी सजवून माझ्याबरोबर समाधीच्या दर्शनाला नेण्याचा बेत मीं कबजींच्या सल्ल्यानें ठरविला खरा; पण जोत्याजी आतांच बजावून गेला त्याप्रमाणें अशानें राजलक्ष्मीचा खरोखरच अपमान होत आहे काय? कमळजेनें माझ्या वचनावर विश्वासून, माझ्या भिडेला बळी पडून पूज्य भावानें आपलें जविन सर्वस्त्र मला अर्पण केलें, त्यामुळेंच जग तिला पतिता म्हणते. हा अपराध कमळजेचा नसून माझा आहे. मी कमळजेला अग्निब्राह्मणांच्या व देवाधर्माच्या साक्षीनें महाराणी करण्याचें वचन दिले ते हातून पूर्ण होण्यापूर्वींच तिला नादीं लावून भ्रष्टविण्याचें

पाप माझ्याहातून घडलें खरें. तें पाप महाराणीच्या वस्त्रालंकारानें कसें झांकलें जाईल हेंच मला कळत नाहीं.

[ सोवळें नेसून हातीं तीर्थोदक घेतलेला **कलुषा** प्रवेश करतो ]

**कलुषा :** महाराज, होमहवन सर्व यथासांग पार पडलें. पण महाराजांची चर्या इतकी चिंतातुर कां दिसते ?—

**संभाजी :** कबजी, माझ्या मनांत एक शंका आली आहे. तिचें निराकरण तुमच्या-खेरीज होणें शक्य नाहीं. म्हणून मी तुमचीच वाट पहात होतों.

**कलुषा :** ( स्वगत ) आमच्या शत्रुमंडळींनें एवढ्यांतल्या एवढ्यांत माझ्या पुढील बेतांना खो घालायचा प्रयत्न केला वाटतें ! ठीक आहे. (उघड) महाराजांना कसली शंका आली आहे ?

**संभाजी :** कमळजा धर्मविधिपूर्वक माझी सहचारिणी होण्यापूर्वींच महाराणीच्या नात्यानें जगजाहीरपणें वागूं लागली, तर तो राजलक्ष्मीचा उघड उघड अपमान होईल व लोकांत आम्हां उभयतांचें हंसें होईल असें मला वाटतें. तुम्हांला काय वाटतें ?

**कलुषा :** याचा प्रथमच पूर्ण विचार करून मीं आपणाला योग्य तीच सल्ला दिली आहे. असें असतांही पुन्हां आपण ही शंका काढली, ही कांहीं आपली स्वतःची शंका नव्हे. कुणींतरी द्वेषबुद्धीनें हें नवें कारस्थान रचायला सुरवात केलेली दिसते. जोत्याजी आपणाला इतक्यांत भेटून गेला काय ?

**संभाजी :** होय . तो मला भेटून गेला खरा.

**कलुषा :** तरी मला वाटलेंच. गेले तीन महिने स्वारी-शिकारीच्या निमित्तानें दूर असल्यामुळें शत्रूंना आयतेंच नाहीं नाहीं त्या उलाढाली करायला फावलें. कमळजाराणीसाहेबांच्या नांवानें भलती सलती नालस्ती यांनींच आरंभिली आहे. परवां इकडे आल्यापासून मी ही कुणकुण ऐकत होतों, ती आज खरी ठरली.

**संभाजी :** कसली कुणकुण ऐकत होतां ?

**कलुषा :** नव्या राणीसाहेबांना राजवटींत थारा द्यायचा नाहीं असा चिटणीस वगैरे माझ्या प्रतिस्पर्धी कारभाऱ्यांचा कट झालेला असून त्यांना येसूबाई राणीसाहेबांचें प्रोत्साहन आहे असे मी ऐकत होतों. त्याच मंडळींनें जोत्याजीला पुढें करून प्रत्यक्ष डाव खेळायला सुरवात केली असावी.

**संभाजी :** इतरांविषयीं मी कांहीं बोलूं शकत नाहीं; पण राणीसाहेब या फंदांत पडणाऱ्या नव्हेत एवढें मात्र खास.

**कलुषा :** तसें असले तर फारच चांगलें. पण—

**संभाजी :** असे अडखळतां कां ?

**कलुषा :** महाराज, माणसाच्या पाठीला डोळे थोडेच असतात ! आपण जरा बारकाईनें चौकशी केली तर माझ्या विधानांची सत्यता आपल्या अनुभवाला पटेल. येसूबाईराणीसाहेबांविरुद्ध आपलें मन निष्कारण जास्त कलुषित होईल या भयानें मी आजवर बोललों नाहीं; पण आतां बोलणे भागच पडलें. आपण या क्षणाला जाऊन पाहिलें तरीदेखील येसूबाईराणीसाहेबांच्या महालांत खलबतें चाललेलीं आपणाला आढळतील !

**संभाजी :** असें आहे काय ? मला याची नीट चौकशी केलीच पाहिजे. पण तुम्ही माझ्या शंकेचें निराकरण केलें नाहीं !

**कलुषा :** एथवर झालें हेंच आपल्या शंकेचें निराकरण.

**संभाजी :** एकूण आपण ठरविलेली योजना कोणत्याहि दृष्टीनें आपणाला जाचक होणार नाहींना ?

**कलुषा :** माझ्या शब्दावर महाराजांचा विश्वास असेल तर पुन्हा सांगतों, मीं महाराजांना प्रारंभीच जी सल्ला दिली ती सर्व बाजूंनी पूर्ण विचार करून दिलेला आहे.

( विद्याधर मद्यासव घेऊन येतो. )

**संभाजी :** ठीक आहे माझी शंका फिटली. तुमच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. ( कलुषा मद्याचा पेला भरून पुढें करतो तो पाहून ) हें काय ?

**कलुषा :** हें आजच्या देवकार्यांतील तीर्थोदक आहे. आपण हें सेवन करावे.

**संभाजी :** ( पेला ओठांना लावून ) कबजी ! हें मद्य आहे वाटतें ? हें मी कसें सेवन करूं ?

**कलुषा :** सेवन करायला कांहीं हरकत नाहीं. तें शक्तिदेवीचें पवित्र तिर्थ आहे. तें तीर्थ सेवन केल्यानें आपण मद्यपानाच्या दोषाला मुळींच पात्र होणार नाहीं. शक्तिदेवीच्या प्रभावानें मद्याचा मादकपणाही त्या तीर्थाच्या अंगीं आतां उरलेला नाही. आपण तें निःशंकपणें मनमुराद सेवन करावें. ( आणखी पेला भरून देतो. संभाजी पितो. ) काय रे विद्याधर, मी सांगून ठेवलें होतें तेंच मद्य तूं नैवेद्याला आणून दिलें होतेंस ना ?

**विद्याधर :** होय सरकार.

**कलुषा :** ( स्वगत ) मग कांहीं हरकत नाहीं. आणखी अंमलशानें समाधीचें दर्शन

करून येईपावेतों याचा अंमल खास टिकेल, आणि माझा कार्यभागहि होईल आणखी कांहीं नाहीं! महाराज शुद्धीवर असले तर राजलक्ष्मीच्या अपमानाचें खूळ ऐनवेळीं यांच्या डोक्यांत थैमान घालूं लागायचें आणि माझ्या कारस्थानांचा डोलारा अकालीं कोसळून जमीनदोस्त व्हायचा!

( **संताजी** प्रवेश करतो )

**संताजी :** सरकार, सज्जनगडाहून आलेल्या एका समर्थशिष्यानें हें पत्र दिलें आहे.

**कलुषा :** संताजी, तुला काळवेळ अगदींच कशी कळत नाहीं! महाराजांना अशा खासगी बैठकीच्या वेळीं त्रास द्यायला कशाला आलास?

**संभाजी :** संताजी! खतें, पत्रें किंवा खलितें कोणाकडून आले तरी ते परस्पर कबजीपाशी द्यायचे हा माझा हुकूम तूं विसरलास वाटते?

**संताजी :** ( हात जोडून ) या सेवकाला कसूर माफ असावी. खुद्द सरकार स्वारी-शिवाय दुसऱ्या कोणीही उघडूं नये असें या पत्रावर स्पष्ट लिहिलेलें आहे.

**कलुषा :** तें तुला रे कसें समजलें?

**संताजी :** मी परस्पर आपणाकडेच यायला निघालों होतों; तोंच चिटणीस थोरल्या राणीसाहेबांच्या महालांतून येतांना भेटले. त्यांना सहज विचारलें तेव्हां ते म्हणाले सरकारांच्या नांवाचें पत्र सरकारांच्याच हातीं पावतें व्हायला हवे. म्हणून इकडे आलों.

**कलुषा :** महाराज, मी आतांच येसूबाईसाहेबांच्या महालांत चालणाऱ्या कार-स्थानाविषयीं बोललों त्याचें हें हातोहात प्रत्यंतर पहा. चिटणिसांना याचवेळीं येसूबाईसाहेबांच्या महालाकडे जाण्याचें काय कारण असेल याचा आपणच विचार करा. संताजी, दे पाहूं इकडे तें पत्र! ( पत्र घेऊन वाचूं लागतो. )

**संभाजी :** चिटणीसांना आतां हें उपद्व्याप सुचूं लागले काय? त्यांना काय वाटतें आपणच मराठशाहीचे कुलमुखत्यार आहोंत असें? आणि राणीसाहेबांशीं फितुरी करतात काय? असल्या चाळ्यांपायींच बाळाजी आवजींना हत्तींच्या पायाखालीं ठार व्हावें लागलें, हें खंडोबल्लाळ इतक्या लौकर विसरलें वाटतें?

**कलुषा :** ( पत्राची घडी करीत ) का रे संताजी, तो समर्थशिष्य येसूबाईसाहेबांना जाऊन भेटला कीं नाहीं?

**संताजी :** तें मला माहीत नाहीं सरकार!

**कलुषा :** माहीत नाहीं? तूं देखील त्या कटांत सामील झालास वाटतें!

**संताजी :** सरकार, या गरीब सेवकावर हा भलताच आळ येतो आहे. जें मीं

डोळ्यांनीं पाहिलेंच नाहीं, तें खरें म्हणून कसें सांगूं ?

**कलुषा :** बरें आहे. असाच्या असाच जा. आणि येसूबाई राणीसाहेबांच्या महालांत भवानीच्या देवालयांत किंवा बागेंत कोण कोण बसून खलबत करीत आहेत तें पाहून मला येऊन सांग.--जा.

**संताजी :** आज्ञा सरकार.

**संभाजी :** कबजी, कुणाचें तें पत्र ?

**कलुषा :** पत्र सज्जनगडच्या स्वामींचें आहे. स्वामींचें नुसतें नांव मात्र आहे. एरव्ही मजकूर इथून तिथून चिटणिशी वळणाचा दिसतो माझा तर असा तर्क वाहतो कीं, चिटणीस वगैरे मंडळींनीं येसूबाईराणीसाहेबांना मसलतींत घेऊन स्वामींशीं संधान बांधलें असावें, आणि आज ऐनवेळीं आपल्या हौसेला खो घालण्यासाठीं परस्पर संन्याशाच्या हातानें साप मारण्याची ही युक्ति अमलांत आणली असावी.

**संभाजी** असें काय ? काय बरें लिहिलें आहे त्या पत्रांत ?

**कलुषा :** तें मला सांगतां येत नाहीं. माझ्याच मुखानें मी माझी निंदा कशी बोलूं !

**संभाजी :** काय ? तुमची निंदा ?

**कलुषा :** होय महाराज. आणि त्यासाठीं वेळदेखील कशी नेमकी शोधून काढली पहा !

**संभाजी :** आणा तें पत्र इकडे. ( पत्र घेऊन फाडून पायांखालीं तुडवीत. ) माझ्या विश्वासांतल्या कबजींची निंदा करणाऱ्या साऱ्या लोकांच्या मताला हा संभाजी असा पायांखालीं तुडवतो. आणि राणीदेखील या निंदकांच्या कटांत सामील झाली काय ?

**कलुषा :** महाराज, आपल्याला माहीतच आहे, कीं थोरल्या आबासाहेबांचें अवसान झालें तेव्हांपासून ही जुनी दरबारी मंडळी आपल्या नाशावर टपून बसली आहेत. मराठशाहीचीं सर्व सूत्रें त्यांना आपल्या हातीं हवीं आहेत थोरल्या आबासाहेबांच्या पश्चात देखील आपणाला पन्हाळगडीं कैदेंत कुजत ठेवून राजाराम महाराजांना गादीवर बसवायचें त्यांचें कारस्थान उलथून पाडण्याच्या कामीं आपणाला मीं साहाय्य केलें, तेव्हांपासून कबजी हा कर्दनकाळ त्यांच्या डोळ्यांत सलतो आहे. आणि येसूबाईराणीसाहेबांना सवतीमत्सराच्या पिशाचानें झपाटल्यामुळें त्या माझ्यावर नाराज होऊन माझ्या प्रतिस्पर्ध्यांना सामील झाल्या आहेत ! त्यांच्या कुटिल मसलती पावलोपावलीं मोडून काढणारे कबजी त्यांना नको आहेत !

**संभाजी :** पण मला कबजी पाहिजे आहेत ! माझ्या कबजींविरुद्ध असे कट करतां काय ? राजद्रोही ! बेईमान ! एवढ्याचसाठीं मी गादीवर येतांच माझ्या राज्यांतील

राजद्रोहांची सारीं पाळेंमुळें दयामाया सोडून प्रथम खणून काढलीं ! मीं शिर्क्यांचें शिरकाण केलें, सोयराबाईआईसाहेबांना भिंतींत चिणून मारलें, चिटणिसांना हत्ती-च्या पायाशीं बांधून ठार केलें, तरीही तो राजद्रोही लांवसटांचा कट अजून जीव धरून राहिला आहे काय ?

[ **संताजी** प्रवेश करतो. ]

**कलुषा :** संताजी, आलास पाहून ?

**संताजी :** आलों पाहून सरकार.

**कलुषा :** कोण कोण काय काय खलबत करीत बसले आहेत ?

**संताजी :** थोरल्या राणीसाहेबांच्या महालांत त्या आणि जोत्याजी दोघेंच बोलत बसलीं आहेत. चिटणीस वगैरे मंडळी आतां नुकतीच गेली असें दासीनें सांगितलें.

**कलुषा :** होय ना ? महाराज, मीं सांगितलें त्याचें पहा हें प्रत्यंतर !

**संभाजी :** संताजी, राणी जोत्याजीशीं काय बोलत होती ?

**संताजी :** तें कांहीं मला नीटसं ऐकूं आलें नाहीं. मी तिथें जातांच त्या एकदम थबकल्या. पण त्या कमळजा राणीसाहेबांविषयीं कांहीं तरी बोलत होत्या, एवढें मात्र मीं ओळखलें.

**कलुषा :** पहा ! माझा तर्क किती अचूक आहे. ( संताजीला ) तूं जा.

[ संताजी जातो.

**संभाजी :** सोयराबाईआईसाहेबांप्रमाणें राणीलाही भिकेचे डोहाळे आठवूं लागले काय ?— बरें, कबजी, देवकार्य सारें आटोपलें ना ?

**कलुषा :** होय. आतां फक्त आजच्या देवकार्यांत मंतरून सिद्ध केलेल्या श्रीफळानें राणीसाहेबांची ओटी भरायची आहे. त्या वेळीं आपण जवळ पाहिजे. ओटीभरणाचा समारंभही देवघरांतच झाला पाहिजे आहे. आपण राणीसाहेबांच्या महालाकडे जाऊन तिकडून देवघराकडे जाणार कीं त्यांनाच इकडे बोलवायचें ?

**संभाजी :** राणीसाहेबांना एवढे श्रम कशाला ? मीच तिकडे जातो. [ जातो.

**कलुषा :** ( स्वगत ) कमळजेला रायगडची राणी करण्याचें नाटक चांगलेंच रंगलें. पण या नाटकाचा शेवट जर कमळजा खरीखुरी महाराणी होऊन होणार असेल तर तो मात्र मी होऊं देणार नाहीं. आजवर महाराजांची राख म्हणून प्रच्छन्न जननिंदेला पात्र झालेली कमळजा महाराजांची कितीही दिल्प्यारी झाली, तरी ती मला सहज आवरतां येईल; पण तीच महाराणी झाली तर दिवसेंदिवस आवरायला जड जाईल.

महाराजांच्या रंगमहालांत व्यभिचारी विलासविहारांत रंगून राहिलेली ही वाघीण दुर्लौकिकाच्या साखळदंडांनीं अखेरपावेतों अशीच ठाणबंदी जखडून राहिल्यानें माझ्या कारस्थानाला खरें यश लाभणार आहे. राणी येसूबाईविषयीं महाराजांचें मन चांगलेंच कलुषित झालें आहे. तेव्हां आतां तिला रसातळाला नेण्यासाठीं नव्यानें श्रम घेण्याचें कारण उरलें नाहीं. राणी रसातळाला गेली कीं, तिच्या बरोबरच माझ्या प्रतिस्पर्धि कारभारी मंडळीचें महत्त्व रसातळाला जाणार यांत संशय नाहीं. अर्थात् आतां महाराजांना मी माझ्या मगरमिठींत जखडून ठेवूं शकतों. ही परिस्थिति आतां तावडतोब सांडणी-स्वार पाठवून बादशहाला कळवावी, म्हणजे बादशहा त्या धोरणानें मराठशाही बुडविण्याचें पुढील बेत ठरवील, व त्या अनुरोधानें मी राजाराणींना पकडून बादशहाच्या पायापाशीं नेऊन गुदरण्याची दिशा आंखीन मला मराठशाही बुडवून बादशाही महाराष्ट्राचा सुभेदार व्हायचें आहे, हा छंदोगामात्य कविकलश पंडितराव ह्या मराठशाहीला ठार करून तिच्या तेराव्याचा ब्राह्मण म्हणून जेवणार, आणि वर महाराष्ट्राच्या सुभेदारीची दक्षणा मिळविणार !

**नृपवैभवा आणि कूटमती मम पायांपाशीं आतां ॥ ध्रु० ॥ यश**
**संपदा होई वश कूटभावें जगिं जीवमात्रा ॥ १ ॥**

[ विद्याधर प्रवेश करतो. ]

**विद्याधर :** सरकार, महाराज आपली वाट पहात आहेत.

**कलुषा :** होय ना ? चल. मी आलों. [ जातात.

**: : ४ : :**

[ शिवाजीमहाराजांची समाधि. **येसूबाई, जोत्याजी व तानाजी.** ]

**तानाजी :** ( समाधीला नमस्कार करून ) आईसाहेब, मी येतो आतां.

**येसूबाई :** आतां तरी तुझ्या डोक्यांतलं कमळजेला मारायचं वेड गेलं ना ? समाधी समोर शपथ घेतली आहेस बरं ! ध्यानांत ठेव. जा आतां मिरवणुकींत म्हणजे सर्वांना आनंद होईल. [ जातो. ] जोत्याजी, तुम्ही जा आणि जरा त्याच्यावर नजर ठेवा. [ जोत्याजी जातो. ] देव माझा पाठिराखा म्हणून कमळजेच्या जिवावरचं अरिष्ट नेमकं दिव्यावातीनं शोधून काढल्यासारखं माझ्या नजरेला आलं आणि तें मला टाळतां आलं. इकडे येतांच पहिल्याच पावलीं मला यश आलं, त्यावरून असा विश्वास वाटूं लागला आहे की, देव आणि देवपद पावून ह्या समाधिस्थानीं दिव्य-देहानें वास करणारे मामंजी माझा धांवा खास ऐकतील.

दयाळा! देवा! दावा दया। मम अपराधां घालोनि पोटीं
दावा दया॥धृ०॥ सुखविलास आशा पतिदेवतेला मतिमोह
पाडी; करुणानिधाना! वारा भया॥१॥

[नमस्कार करून समाधीला प्रदक्षिणा घालूं लागते. **जोत्याजी** प्रवेश करतो ]

**जोत्याजी :** आईसाहेब! (कपाळावर हात मारून घेतो.)

**येसूबाई :** हें काय जोत्याजी, तुम्हांला इतका खेद करायला काय झालं!

**जोत्याजी :** आईसाहेब, ऐकूं नये ते ऐकणें पुन्हा नशिबीं आलें आणि आतां पाहूं नये तें पहाण्याचें नशिबीं येऊं पहात आहे!

**येसूबाई :** यांत मी समजूं तरी काय? तानाजीनें कांहीं अविचार केला कीं काय?

**जोत्याजी :** तानाजीनें अविचार केला असतां तर फार बरें झाले असतें. त्यामुळें आपली, महाराजांची आणि राजवटीची सर्वांचीच विटंबना टळली असती. पण आपला छळ करायची भवितव्यतेची हौस अजून भागली नाहीं म्हणूनच महाराजांना आज समाधीला दर्शनाला येण्याच्या दिवशींच दारू पिण्याची बुद्धि सुचली.

**येसूबाई :** काय दारू? हाय रे दैवा!

**जोत्याजी :** एवढ्यानेंच दैवानें आपलें दुर्विलास थांबविले असते तरी मी देवाचा आभारी झालों असतों. पण आईसाहेब, आमच्या दैवाची निष्ठुरता इथें संपण्या-ऐवजी वाढीला लागते आहे. मी आतां बोललों ही त्या निष्ठुरतेची नुस्ती ओझरती झळ आहे. वैऱ्यावरदेखील येऊं नये तसला प्रसंग हें दैव आज आपणावर ओढून आणणार आहे. आज स्वर्गलोकींच्या गंगेला भूलोकाच्या नरककुंडांत न्हावें लागणार आहे. पतिव्रतेची पुण्याई आज पापांनीं पाय धुतलेल्या बाजारबसवीच्या पायांखाली तुडविली जाणार आहे. आपली दावेदारीण ती अवदसा आज आपणाला या समाधी-समोर स्वतःची क्षमा मागायला लावणार आहे.

**येसूबाई :** काय म्हणालांत? कमळजा मला क्षमा मागायला लावणार आहे? ती कां म्हणून? मी तिचा असा अपराध तरी काय केला?

**जोत्याजी :** आपण तिला तानाजीच्या हातून वांचवलं, तिला राणीपद प्राप्त करून देऊन तिच्या व्यभिचारावर पांघरूण घालायचा निश्चय केलात हाच आपला अपराध!

**येसूबाई :** हें मला खरं वाटत नाहीं. मीं अपराध कांहींच केला नसतांना कमळजा असा भलताच हेका धरून बसेल तरी कशी? आणि समजा, तिनें कसल्याही

गैरसमजामुळं चिडून असा हेका धरला तरी महाराज तो पुरवायला कबूल कसे होतील ?

**जोत्याजी :** हें काय विचारतां ? दारूच्या धुंदींत मनुष्य काय करणार नाहीं ?

**येसूबाई :** इतके महाराज जर स्वतःच्या स्वाधीन नाहींसे झाले आहेत तर तुम्हीं तरी त्यांच्यापाशीं राहून त्यांना शुद्धीवर आणायचं कीं नाहीं ?

**जोत्याजी :** आईसाहेब, मी प्रयत्न करून पाहिला. पण माझा तिथें काहींच उपाय चालण्याजोगा नाहीं. मी महाराजांच्या पायापाशीं गेलों, तोंच कमळजेनें मला फितूर म्हणून माझी अवहेलना केली. आणि महाराजांनीं लाथ उगारून मला मागें परतवलें.

**येसूबाई :** तुम्हांला लाथ उगारली ? अरेरे ! करूं नये तें महाराजांनीं केलं !

**जोत्याजी :** आई भवानी ! तूंच आता राजवटीची लाज राखली पाहिजेस. छत्रपति शिवाजीमहाराज. आपण आमच्यासारख्या स्वामिभक्ताना हाताशीं धरून या रायगडच्या राजलक्ष्मीची प्राणप्रतिष्ठा केली त्याच राजलक्ष्मीची अशी विटंबना आपल्या समोर झालेली पहाण्याचा दुर्धर प्रसंग आमच्यावर आलेला आपणाला सहन होईल का ?–आईसाहेब, आपण आता एक करा. हीं फुलें घ्या, हात जोडून मनोभावानें आबासाहेबांची प्रार्थना करा. मी मनांतून गाऱ्हाणें घालून कौल मागतों; आणि आपण हीं फुलें समाधीला वाहा. आपण आबासाहेबांचा जीव कीं प्राण होता. आमच्या हांकेला नाहीं तरी पण आपल्या हांकेला ते धांवून येतील आणि महाराजांच्या अंतःकरणांत उभे राहून त्यांना शुद्धीवर आणतील.

[ येसूबाई फुलें घेऊन हात जोडते. जोत्याजी गुडघे टेकून प्रार्थना करतो. ]

**येसूबाई :** वाहूं फुलं ?

**जोत्याजी :** वाहा. पण डोळे मिटून वाहा. ( येसूबाई फूलें वाहते. ) हाय रे नशीबा !

**येसूबाई :** जोत्याजी, काय झालं ?

**जोत्याजी :** आईसाहेब, देवदेखील देवकळेला जागेनासा झाला. महाराज शुद्धीवर येऊन आ[illegible]चा प्रसंग टळणार असेल तर उजवा कौल मागितला तो डावा कौल मिळाला ! हाय-हाय ! महापुरुषा, जिवंतपणीं आपण या जोत्याजीचा शब्द मोडून पायंडा ओलांडला नाहीं. तेवढीदेखील पुण्याई माझ्या अभाग्याच्या पदरीं आतां [illegible]ली नाहीं ! आतां जगण्यांत शोभा राहिली नाहीं. आजवर मी जिवाभावाच्या

मोलानें ज्या राजवटीच्या इभ्रतीसाठीं झटलों त्या राजवटीची अशी पायमळगी पहाण्यापेक्षां--( तरवार मानेवर उगारतो.)

**येसूबाई :** ( तरवार धरून ) जोत्याजी, जोत्याजी, हात आंवरा, वडिलांसारखे तुम्ही. मी मुलीनं तुम्हांला बोलूं नये-पण असं खुळ्यासारखं काय करतां ?

**जोत्याजी :** खरंच, हे धिंडवडे पहाण्यापेक्षां मला खूळ लागेल तर बरें होईल. देवा, मला खुळा तरी कर किंवा माझे डोळे तरी झांक !

**येसूबाई :** म्हाताऱ्या माणसांनीं कसं दर्यासारखं गंभीर, धीरवान असायला हवं.तुम्ही मला लेंकराला अशा प्रसंगी धीर द्यायचा त्या तुम्हींच जर धीर सोडला तर जोत्याजी, मी धीरासाठीं आशेनं कुणाच्याही तोंडाकडे पाहूं ! आई नाहीं, बाप नाहीं,भाऊ नाहीं- मी दुःखाच्या आंचेनं अशी कष्टी झालें तर प्रेमानं पाठीवरून हात फिरवून धीर द्यायला मला मायेचं माणूस देवानं कुणीसुद्धां ठेवलं नाहीं ! (डोळ्याला पदर लावते.)

( **तानाजी** प्रवेश करतो. )

**तानाजी :** आईसाहेब, मी आपला मायेचा भाऊ तानाजी आहे.

**येसूबाई :** तानाजी, मिरवणूक संपली का ? महाराज आले कां ?

**तानाजी :** मिरवणूक संपली, आतां महाराज इतक्यांत येतील.

**येसूबाई :** मग तूंच एकटा त्यांना सोडून पुढं कां बरं आलास ?

**तानाजी :** आईसाहेब, माझ्याकडून घेवविलेली शपथ आपले दुःख निवारण्याच्या कामीं मला आड येते आहे. त्या शपथेची सोडवणूक करून घेण्यासाठीं मीं आपणा-कडे आलों आहे. तेवढी आपण कृपा करा आणि मला माझ्या मार्गानें जाऊं द्या.

**येसूबाई :** तूं तुझ्या मार्गानें जाणार म्हणजे कमळजेच्या जिवाला अपाय करणार हेंच ना ?

**तानाजी :** अर्थात्, हें सांगायलादेखील मी आपणाकडे आलों नसतों,पण मी शपथेनें बांधला गेल्यामुळें तें बंधन तोडून घेण्यासाठीं मला प्रथम इकडे येणें भाग पडलें.

**जोत्याजी :** ह्या तोंडपुजेपणांत काय अर्थ ? आईसाहेबांच्या कल्याणाची आणि राजवटीच्या इभ्रतीची तुला खरी कळकळ असती, तुझी राजनिष्ठा सचोटीची असती तर तूं शपथेच्या पाळणुकीचें एवढें थोतांड माजविलेंच नसतेस. जें कांहीं करावयाचें तें परस्परच केलें असतेंस.

**तानाजी :** असें म्हणतां ! ठीक आहे. आईसाहेब, आपण माझी शपथेतून सोडव-णूक करा किंवा करूं नका; मी माझ्या मार्गानें चाललों. ( जाऊं लागतो. ).

**येसूबाई :** तुला माझ्या गळ्याची शपथ आहे. माझा शब्द मानावयाचा नसेल तर त्या तरवारीनं अगोदर या बहिणीला ठार कर आणि मग त्या बहिणीला ठार करायला जा.

**तानाजी :** नाहीं. आईसाहेब, मला माझ्या कुळाची आणि राजवटीची अब्रू सांभाळण्यासाठीं कमळजेला ठार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

[ जाऊं लागतो तोंच **कमळजा**, **गजरा व संभाजी**, **पिराजी** आणि **निराजी** प्रवेश करतात. ]

**संभाजी :** तानाजी, काय तूं माझ्या आवडत्या कमळजेला ठार करणार ?

**कमळजा :** काय दादा, तूं मला ठार करणार ?

**गजरा :** काय राणीसाहेबांना ठार करणार ?

**संभाजी :** तानाजी, तूं बहिणीच्या जिवावर इतका उदारसा झालास ?

**तानाजी :** महाराज, तो प्रश्न आपण आपल्याच मनाला विचारा. तिला ठार करूं नको तर राजाची राख म्हणून मिरवायला जिवंत ठेवूं कीं काय ?

**कमळजा :** ( कानावर हात ठेवून ) हरहर ! चांडाळा, पाठच्या बहिणीचं काळीज अशा अभद्र शब्दांनीं भेदतांना तुझं काळीज भेदरत रे कसं नाहीं ?

**तानाजी :** खऱ्याला पाहून भेदरणारे आणि खोट्या करणीला न डरणारे उरफाटें काळीज देवानें मला दिलें नाहीं. तें माझ्या बहिणीला, लावसटी, तुला दिलें आहे. तुझ्या बदूकरणीनें मला जगांत तोंड दाखवायला जागा नाहीशीं झाली आहे. इतका वेळ कानीकपाळीं ओरडून तुला रामोपचाराच्या गोष्टी सांगितल्या तरी माणुसकीचा लवलेशही तुझ्या मनाला शिवला नाहीं. ह्या माऊलीनें तुला व्यभिचाराच्या रौरव नरकांतून वर काढण्यासाठीं आपल्या अखंड पुण्याईचा वरदहस्त पुढें केला आणि तूं तिच्या हाताचा चावा घेण्यासाठीं डिवचलेल्या नागिनीसारखी फोंफावत पुढें आलीस ! तुला ठेंचून ठार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. ( तरवार घेऊन तिच्यावर उगारतो. )

**संभाजी :** तानाजी, हात आंवरता घे, नाहींपेक्षां मला तो कलम करावा लागेल.

**तानाजी :** माझा हातच काय, माझी मान देखील कलम केलीत तरी बेहेत्तर; पण ह्या कारटीनें माझ्या कुळाला लावलेला कलंक मी हिच्याच रक्तानें धुऊन काढणार. यावेळी आपण मला विरोध कराल तर मला अतिप्रसंग करावा लागेल.

**संभाजी :** काय ? ( तरवारीला हात घालतो. )

**कमळजा :** मेल्या मांगा, काय म्हणालास ? ( पिराजी व निराजी यांना ) पकडा या चांडाळाला, आणि कैदखान्यांत नेऊन कोंडून ठेवा. ( पिराजी व निराजी संभाजीकडे पाहतात. )

**येसूबाई :** कमळजाबाई, पाठीराख्या भावावर अशा निष्ठुर होऊं नका.

**संभाजी :** पाहतां काय ? नव्या राणीसाहेबांचा हुकूम झाला आहे; पकडा त्याला. या मंगल प्रसंगी अपशकून नको म्हणून, नाहींपेक्षां नव्या राणीसाहेबांच्या जिवावर उठणाऱ्या या बेमुर्वतखोराचें शीरच धडावेगळें केलें असतें.

( पिराजी व निराजी तानाजीला पकडून नेतात. )

**कमळजा :** महाराजांच्या जिवावर उदार होणाऱ्या त्या राजद्रोही सैतानाचे शीर धडावेगळें झालें असतें तरीदेखील कांहीं हरकत नव्हती.

**येसूबाई :** कमळजाबाई, हें तुम्हांला शोभलं नाहीं. हें तुम्हीं दुधाच्या हंड्यांत मीठ कालवलं!

**कमळजा :** येसूबाई, तुमचा मानभावीपणा मी सकाळपासून ओळखून चुकलें आहे. दुधाच्या हंड्यांत मीठ मीं कालवलं काय ? महाराज, मीं इतका वेळ आपणांला सांगितलं तें हें पहा ! यांनींच मला ठार मारायला माझ्या दादाला चिथवलं आणि हा प्रसंग आणला. माझा दुष्टावा ऐन वेळीं साधण्यासाठीं या मुद्दाम अगोदर इथं येऊन तिष्ठत बसल्या आहेत. दुधाच्या हंड्यांत मीठ मीं कालवलं काय ? महाराज, दादाच्या हातून या घडीला मी ठार झालें असतें तरी पुरवलं असतं. पण या शिरजोर राणीनं सवतीमत्सराच्या भरी पडून माझा अपमान-उपहास माझी विटंबना मांडली आहे. याचा मला या क्षणीं, या जागीं न्याय पाहिजे आहे !

**गजरा :** ( हळूच ) राणीसाहेब, तुम्ही तिला राणी कां म्हणतां पण ?

**संभाजी :** येसू, माझ्या कमळजेला ठार करायचें कारस्थान रचतेस काय ?

**येसूबाई :** देवाशपथ—या समाधीशपथ—आपल्या पायांशपथ असले असुरी विचार माझ्या ध्यानीं मनींही कधीं आले नाहींत.

**संभाजी :** ढालगज ! तूं माझ्या पायांचीच काय माझ्या गळ्याची देखील शपथ घेशील ! पण मला तुझी शपथ नको आहे. शपथेवर विश्वास ठेवण्याइतका मी भोळा सांब नाहीं. राणी झाली म्हणजे ती विधात्याच्या मांडीवर जाऊन बसली अशी तुला घमेंड झाली आहे. त्या घमेंडीच्या भरांत तूं माझ्या प्रतिस्पर्ध्यांना सामील होऊन आजवर माझ्या कबजी विरुद्ध कारस्थानें रचीत आलीस आणि आतां तानाजीला फितूर करून कमळजेला ठार करायचा बेत करण्यापर्यंत तुझ्या कारस्थाची मजल गेली आहे ?

**कमळजा :** यांनीं माझी मांडलेली विटंबना मला मरणापेक्षांही जास्त दुःखद वाटत आहे. सकाळपासून यांनीं वैरिणीप्रमाणें माझा मांडूं नये तसला छळ मांडला आहे. आणि हा माझा हाडवैरी त्यांना सामील आहे यांच्या चिथावणीनं यानंदेखील सकाळी मला देऊं नये तसली शिवी दिली

**जोत्याजी :** कमळजे !

**गजरा :** ( हळूच ) राणीसाहेब, ऐका ! हा मेला अजून देखील आपणाला राणीसाहेब म्हणायला तयार नाहीं !

**कमळजा :** तें कांहीं नाहीं, मला न्याय पाहिजे आहे महाराज, मला न्याय मिळाला नाहीं तर मी आपला जीव ठेवायची नाहीं ?

**संभाजी :** लाडके. तुला कसा न्याय पाहिजे ? बोल !

**कमळजा :** येसूबाईनीं केलेल्या आगळकीबद्दल माझी पदर पसरून क्षमा मागितली पाहिजे. तरच आपण न्याय केला असं मी म्हणेन.

**येसूबाई :** क्षमा मागायला माझी ना नाहीं. पण मीं अपराध केला नाहीं.

**कमळजा :** अपराध केला नाहीं ? येसूबाई, खोटं कशाला बोलतां ? खोटं बोलून महाराजांना एक फसवाल. पण देवालाही फसवाल ?

**येसूबाई :** बाई, मीं महाराजांनाही फसवीत नाहीं आणि देवालाही फसवीत नाहीं. खोटं कसं बोलावं हें माझ्या बाळपणीं माझ्या आईबापांनीं मला शिकविलं नाहीं. खोटं बोलून मला काय मोक्ष मिळावायचा आहे ?

**कमळजा :** खोटं बोलण्यानं मोक्ष मिळत नसतो; नरक मिळत असतो.– महाराज !

**संभाजी :** बस्स ! हा खऱ्याखोट्याचा काथ्याकूट मला नको आहे. येसू, तूं कमळजेचा अपराध केला आहेस, त्याबद्दल तिची क्षमा मागितलीच पाहिजेस !

**येसूबाई :** पण महाराज, मीं मुळींच अपराध केला नाहीं; असं असतां आपण मला त्यांची क्षमा मागायला लावली तर जग काय म्हणेल ?

**जोत्याजी :** बोलूं नये पण बोलल्याशिवाय रहावत नाहीं; महाराज राणीनें लोकांची माफी नाहीं मागायची ! राणीच्या रूपानें आज रायगडीं राजलक्ष्मी नांदत आहे ती राणीचें मस्तक भलत्यासलत्यासमोर नमलेलें पाहातांच रुसून निघून जाईल. याउपर आपणाला राजलक्ष्मीची अशी विटंबना करायचीच असेल तर अगोदर मला ठार करा आणि मग आपण कांहींही करा. ज्या या दोन डोळ्यांनीं थोरल्या आबासाहेबांची राजवट पाहिलीं त्या डोळ्यांनीं त्याच राजवटीचे हे धिंडवडे पाहण्यापूर्वी हे डोळे मिटलेले बरें !

**कमळजा :** महाराज, जेव्हां तेव्हां असलीं घालून पाडून बोललेलीं बोलणीं ऐकून घ्यायचंच का या कमळजेच्या नाशिबीं आहे ?

**जोत्याजी :** कमळजे, नशिबाची थोर माणसें मनानेंही थोर आणि महासागरा-प्रमाणें शांत असतात. तीं कधीं अशी भाद्रपदांत जन्मलेल्या गुडघाभर पाण्याच्या नदीनाल्यांप्रमाणें खळखळ करीत नसतात !

**कमळजा :** राजे नुसते नांवाचे ! आपल्या अंगीं रामच नाहीं ! महाराज, खरोखर मी आजवर फसलें ! आपल्या नादीं लागून नादानपणा मात्र फुकट पदरीं बांधून घेतला !

**संभाजी :** कमळजे, अशी उतावळी होऊं नकोस.--हां ! येसू, तुला कमळजेची क्षमा मागितलीच पाहिजे. नाहींपेक्षां तुला राणीपदाला अंतरावें लागेल आणि माझे पायही अंतरतील.

**येसूबाई :** राणीपदाला मी अंतरले तरी चिंता नाहीं. पण हे पाय मला अंतरतां कामा नयेत. राणीपदाचं मान-वैभव क्षणभंगुर आहे; पण पतिपद हेंच आम्हां पतिव्रतांचं मोक्षपद ! सावित्री राजवैभवाचा लोभ न धरतां सत्यवानाला वरून भिकारीण झाली; पण पतिसेवेच्या पुण्याईमुळंच काळाच्या जबड्यांतून पतीला वाचवून त्याला राजवैभवाची जोड मिळवून देऊं शकली. एवढी या पायाची पुण्याई थोर आहे ! ह्या पायांना मी अंतरणार नाहीं.

**कमळजा :** येसूबाई, तुम्हीं अपराध माझा केला आहे, आणि क्षमा मागायची ती माझीच मागितली पाहिजे !

**येसूबाई :** ( हात जोडून ) महाराज !

**संभाजी :** तूं कमळजेची क्षमा मागितलीच पाहिजेस ! राणी झाली तरी ती देखील केल्या अपराधाबद्दल शिक्षेला पात्र ठरते असाच माझ्या राज्यातील न्यायाचा लौकिक झाला पाहिजे !

**येसूबाई :** हाच आपला न्याय आणि हाच आपला लौकिक असेल तर आपली आज्ञा मानायला माझी मुळींच ना नाहीं. महाराज, पति हाच आम्हा पतिव्रतांचा देव. पतिसेवा हाच आमचा धर्म आणि पति हेंच आमचें परब्रह्म ! खऱ्या पतिव्रतेला पतिवेगळ्या परमेश्वराची ओळखदेखील नसते. पतिदेवा, आपल्या आज्ञेंत मीं कुणालाही हात जोडले तरी ते आपल्यालाच जोडले ! आज कमळजाबाई हेंच माझ्या पतिदेवाचं अधिष्ठान आहे. राजेश्वरा, महाराष्ट्राची महाराणी मीं

कुणासमोर कशी मान नमवूं हा मीपणा विसरून ही आपली दासी कमळजेला आपलें अधिष्ठान कल्पून नमस्कार करीत आहे. ( पदर पसरून )--कमळजाबाई, मला केल्या अपराधाची क्षमा करा. ( शाळुंखा दुभंगते. समाधींतून ज्वाला निघूं लागतात. )

**जोत्याजी :** महाराज ! हा अपशकून पहा ! राजलक्ष्मीचा हा अपमान थोरल्या आबासाहेबांना सहन झाला नाहीं. राजलक्ष्मीची आपण जाणून बुजून अशी विटंबना केली म्हणून थोरले आबासाहेब कोपले. त्यांच्या कोपाग्नीच्या या ज्वाळा पहा, आणि अजून तरी शुद्धीवर या. ( संभाजी व कमळजा चपापून एकमेकांकडे पहातात. पडदा पडतो. )

# ३

:: १ ::

[ स्थळ—विशाळगडावरील राजमहाल. **गजरा** प्रविष्ट. ]

**गजरा:** ( स्वगत ) तानाजीरावांना कमळजाराणीसाहेबांनीं मुद्दाम इकडे विशाळगडी आणवलं तें त्यांना भाग्याला चढवण्यासाठींच ! अर्थात् त्यांचं मन माझ्यावर बसलं तर मीदेखील एकदम भाग्याला चढेन ! महाराजांच्या अभावीं तानाजीराव कांहीं वाईट नाहींत. पण ते तरी मला पदरांत घेतील का ?

> **सांग कधीं भेटसी साजणा रे ! पायीं तुझ्याच जिव गुंतला ॥धरु०॥ नारी सुकुमार मी ज्वानी उमराव तूं ! प्राणसख्या राजसा मोहना रे ॥ १ ॥ झाली दिवाणी तुझ्यावीण नार ही ! फार काय सांगूं मी सुंदरा रे ॥ २ ॥**

[ कलुषा प्रवेश करतो ]

कमळजा राणीसाहेबांनीं सरकारांना पुन्हा आठवण करण्यासाठीं मला पाठविलं आहे. महाराज आतां सकाळच्या फेरफटक्याहून येतांना सरकारांना भेट देतलि तेव्हां तानाजीरावांविषयींची महाराजांच्या मनांतली तेढ दूर होऊन तानाजीरावांची मुक्तता होईल अशी मखलाशी करायला सरकारांनीं विसरूं नये.

**कलुषा :** त्यांना म्हणावें सर्व कांहीं माझ्या ध्यानीं आहे. मीं काय करायचें तें यथास्थित करतों. बरें, तूं नेहमीं कमळजा राणीसाहेबांबरोबर असतेस, त्यांचें मन इकडे आल्यापासून कांहींसें पालटलें आहे असें तुला नाहीं वाटत ?

**गजरा :** कांहींसं कां ? पुष्कळच पालटलं आहे. इकडे आल्यापासून आज पंधरा दिवस मी रोज पहातें आहें, येसूबाईसाहेबांची विटंबना आपल्या हातून झाली आणि भावाच्या कपाळीं कैद आणायलाही आपण कारण झालों या दोन गोष्टीसाठीं त्या आतांशा अगदीं झुरणीला लागलेल्या आहेत. महाराजदेखील आपण दारूच्या धुंदींत करूं नये तें केलं असं म्हणून एकसारखे हळहळत असतात.- बरं; येतें मी आतां ! [ जाते.

**कलुषा :** ( स्वगत ) एकूण राणीचें उच्चाटण करण्यासाठीं म्हणून जो डाव मीं रचिला तो आतां माझ्यावरच उलटूं पहात आहे म्हणायचा ! राणी आणि महाराज यांना अलग अलग बादशहापाशीं नेऊन गुदरायला सोपें जावें म्हणून मी महाराजांना हवा पालटायच्या निमित्तानें इकडे विशाळगडीं पाठवून दिलें आणि त्यांच्यामागें राणीला युवराजांसह रायगडीं नजरकैदेंत डांबून ठेवलें. हेतु हा कीं बादशाही सैन्याला एकदम दोन्ही ठिकाणीं वेढा देतां येऊन राजा व राणी एका दिवशीं, या कानाचें त्या कानाला न कळतां कैद व्हावीं. पण मीं बादशहाकडे सांडणीस्वार पाठवून ही मसलत कळवली त्याला एक महिना होत आला, तरी अजून उत्तर नाहीं. बादशाही राजकारणांत तरी इतकी दिरंगाई कां बरें चालली आहे ? राणोजी शिर्का मध्येंच एकाएकी रायगडाहून जो निघून गेला, त्यानें मोगलाईंत जाऊन बादशहाच्या कानाशीं लागून माझ्या कारस्थानावर बिब्बा घालायचे उपद्व्याप तर आरंभले नसतील ना ?

[ **संताजी** प्रवेश करतो. ]

**संताजी :** सरकार, राणोजी शिर्के आत्तांच रायगडावरून आले, ते आपली भेट घेऊं इच्छितात.

**कलुषा :** त्यांना आंत पाठवून दे जा. [ संताजी जातो. ] राणोजी आला, सोन्याहून पिवळें झालें. आता पहिल्या सपाट्याला त्या हरामखोराला राजद्रोही ठरवून कैद करतो, आणि महाराज भेटले कीं, त्यांना सांगून एकदम कडेलोट करायला लावतों. त्याच दादणीला तानाजीलाही बांधून नाहींसा करून टाकतों.

**करिन अरिनाश; वरिन विभवास। हार-जात जरि जडे यशास ॥ ध्रु० ॥ घेइं निज करीं आतां अभिनव कपटपाश। बांकवीन पदिं खुळा नरेश ॥ १ ॥**

[ राणोजी प्रवेश करतो. ]

**राणोजी :** कबजी, मी परवां मोगलाईतून माघारा आलों, तो आपली भेट घेण्यासाठीं प्रथम थेट रायगडीं गेलों. पण आपली आणि माझी अगदीं थोडक्यांत चुकामूक झाली–म्हणून तसाच इकडे आलों. आपली भेट झाली, फार चांगलें झालें.

**कलुषा :** राणोजीराव, तुम्ही मोगलाईतून मराठशाहींत येतां काय, मनसबदारी मिळवतां काय, पुन्हा आम्हांला नकळत मोंगलाईंत जातां काय, पुन्हां येतां काय, छेः ! छेः !— तुमचीं हीं कारस्थानें आम्हांला ओळखूं येत नाहींत असें तुम्हाला वाटतें ?

**राणोजी :** कसलीं माझी कारस्थानें ?

**कलुषा :** कसलीं कारस्थानें ? तुम्ही मराठशाहीचे मनसबदार असून महाराजांविरुद्ध बादशहाशीं फितूर आहां असा आम्हांला पक्का वहीम येतो आहे.

**राणोजी :** ज्या गांवच्या बोरी त्यांच गांवच्या बाभळी ! आपण प्रथम बादशहां-समोर फितूरीचा बेलभंडार उचलून इकडे आलां म्हणून आपणाला जिकडे तिकडे फितुरी दिसतें आहे.

**कलुषा :** काय, मी फितूर ?

**राणोजी :** होय, आपण फितूर !

**कलुषा :** ( स्वगत ) कशाच्या जोरावर हा सैतान आज इतका जोरावला आहे बरें ? ( उघड ) राणोजीराव, तुम्ही छत्रपतींच्या अमात्यांचा द्रोह करीत आहां ! अमात्यांचा द्रोह म्हणजे प्रत्यक्ष राजद्रोहच ! या घोर अपराधाबद्दल तुम्हांला तसेंच घोर शासन भोगावें लागेल.

**राणोजी :** जर मीं राजद्रोही ठरलों तर आपणही राजद्रोही ठराल. फितुरीबद्दल बळीच पडायचा झाला तर पहिला आपला पडेल आणि नंतर माझा ! मी तर प्रथमपासून संभाजीराजाचा उघड उघड शत्रु आहें ! संभाजीराजानें शिर्क्यांचें शिरकाण केलें त्याचा सूड म्हणून मी त्याचा बळी घेईन, आणि भोंसले राजांच्या राजवटीचा समूळ विध्वंस करून तिच्यावरून गाढवांचा नांगर फिरवीन हीच माझी महत्त्वाकांक्षा, हेच माझें इतिकर्तव्य ! माझा स्वर्ग—मोक्ष-वैकुंठ सारा काय तो हा ! मला संभाजीराजांचा समूळ नाश करण्यापुरती औरंगजेब बादशहाची मदत आहे, आणि म्हणूनच मी हक्कानें आपली मदत मागायला आलों आहे.

**कलुषा :** पण बादशहाचा आणि माझा तरी काय संबंध ?

**राणोजी :** असें काय ? ( कमरपट्ट्यांतून पत्र काढून कलुषाला देऊन ) हा पहा बादशहांचा आणि आपला काय संबंध तो. ( कलुषा पत्र वाचतो. ) आतां तरी आपली समजूत पटली का ?

**कलुषा :** बादशहाचा हुकूम मला शिरसामान्य आहे. राणोजीराव, ही राजकारणाची नाजुक बाब असल्यामुळेंच मीं तुम्हांला इतका वेळ तावून सुलाखून पाहिलें. आतां तुम्ही सांगाल ती कामगिरी करायला माझी तयारी आहे. तुम्हीं आम्ही आतां दोस्त झालों. ( राणोजीचा हात आपल्या हातीं घेऊन ) सांगा तुमची काय आज्ञा आहे ?

**राणोजी :** बादशाही सरदार इलाचीबेग बादशहाच्या हुकुमावरून पुरेशा फौजफाट्यानिशीं इतक्यांतच महाराष्ट्रावर चालून येईल. बादशहाच्या हेरांनीं अगोदरच सर्व टेहळणी करून संगमेश्वरचा किल्ला हा सर्वांत जास्त सोईची जागा म्हणून मुक्रर केली आहे. तेव्हां आतां आपण एवढेंच करायचें, महाराजांना रायगडाहून इथें विशाळगडीं आणलें तसेंच इथून संगमेश्वरीं न्यायचें. दरम्यान् महाराजांना बादशहाच्या बेताची गुणगुण लागली व ते लढाईसाठीं उठाव करूं लागले तर हरउपायांनीं त्यांची उकळी जागच्या जागीं जिरली जाईल एवढें तुम्हीं करायचें. राजे संगमेश्वरीं जाण्याचा अवकाश कीं संगमेश्वराच्या किल्ल्याला वेढा देऊन राजांच्या मानेसभोंवार फेंकण्यासाठीं हातीं यमपाश घेऊन इलाचीबेग सज्ज आहे.

**कलुषा :** तें सर्व खरें; पण शेळीचे कान गोसाव्याच्या हातीं म्हणतात तसें सारेंच तिरपागडें झालें आहे. कमळजा राणीसाहेबांच्या निमित्तानें तुमच्या तानाजींचें महाराजांपाशीं फारच प्रस्थ वाढूं पहात आहे. तुम्हांला तो प्रकार कळला असेलच.

**राणोजी :** होय. मला ओझरत्या कांहीं कांहीं गोष्टी कळल्या आहेत

**कलुषा :** झालें तर. तो तानाजी तेवढा तुम्हांला वश झाला तर पहा. तो वश झाला तर त्याच्या साहाय्यानें आपण महाराजांना संगमेश्वरींच काय पण प्रत्यक्ष बादशहाच्या गोटांतदेखील नेऊन गुदरूं शकूं

**राणोजी :** त्याला मी वश करीन. पण त्यासाठीं आपण एक केलें पाहिजे.

**कलुषा :** काय केलें पाहिजे ? तुमची आणि तानाजींची भेट करवून दिली पाहिजे एवढेंच ना ? तें काम माझें. मी तुम्हांला आजच्या आज महाराजांच्या संमतीनें तानाजीची साकसुरत भेट करवून देतो.

**राणोजी :** तें तर करायला हवेंच; पण त्याशिवाय आणखी एक तुम्हीं केलें पाहिजे. राजे कमळजेशीं लग्न लावायला नाकबूल झाले पाहिजेत. तानाजी राजांना

पाण्यांत पहातो तो कमळजेला त्यांनीं जन्मांतून उठवली म्हणून. यास्तव कमळजा आज राजांची राख आहे ती अखेरपावेतों राखच राहिली पाहिजे. एवढ्यासाठीं आपण उभयतांनीहि आपली सारी हिंमत पणाला लावली पाहिजे.

( **संभाजी** प्रवेश करतो. )

**संभाजी :** पण तुमच्या हिमतीच्या डावांत हार जाण्याइतका हा संभाजी बेहिमती असेल तेव्हांच्या ना ह्या गोष्टी ? राणोजी, तुम्ही मोगलाई सोडून मराठशाहींत आलांत ते हेंच हिमतीचे डाव खेळण्यासाठीं कीं काय ?

**राणोजी :** महाराजांच्या एकनिष्ठ सेवकांनी कांहींही केले सवरलें तरी महाराजांच्या कल्याणासेंच असणार. जी गोष्ट मी महाराजांपाशीं मग सवडीनें बोलणार होतों ती आतांच बोलतो. कमळजेच्या बाबतींत एकवार झालें तें झालें. आता तिच्याशीं लग्न करण्याचा विचार महाराजांनीं सोडून द्यावा.

**संभाजी :** राणोजी, म्हातारीं माणसें तुम्ही. आपल्या पिकल्या केंसांना स्मरून तरी पोक्तपणाची सल्ला आम्हांला द्यायची कीं कमळजेची अशी केंसानें मान कापायची सल्ला द्यायची ? यांत कुणाचें कोणतें हित साधणार आहे ?

**राणोजी :** राजांची रखेली राणीपदाला पोंचली असा जो राजांच्या नांवाचा बद्लौकिक व्हायचा तो अशानें टळणार आहे.

**कलुषा :** महाराज, राज्यकर्त्यांची इभ्रत ही फार नाजूक गोष्ट आहे. पतिव्रतेनें आपल्या पातिव्रत्याला तसेंच राज्यकर्त्यांनीं आपल्या इभ्रतीला काय वाटेल तें करून जपलें पाहिजे !

**संभाजी :** इभ्रत ! ही माझी इभ्रत ! कबजी, असल्या खोट्या इभ्रतीसाठीं मी माणुसकी सोडूं ? कमळजा फसली ती माझ्या वचनावर विश्वासून फसली ! तें वचन मोडून मी तिची जगभर बेअब्रू होऊं दिली तर माझ्या इभ्रतीवर जगाच्या डोळ्यांत धूळ फेंकण्यापुरता साळसूदपणाचा उजाळा आज चढेल खरा; पण उद्यां हेंच जग मला खदखदां हंसून हिणवूं लागेल.

> **हा नृप वच फोल करिल न अढळ व्हावया जनपदिं विमल स्वकुल-यश ॥ ध्रु ० ॥ बघत मजसि देवराय; फसविन जरि कुल-युवतिस ॥ . ॥**

बस्स ! मी आजवर सांगत आलों तेंच पुन्हा निक्षून सांगतों,—मी कमळजेशीं अग्नि–ब्राह्मणांच्या साक्षीनें लग्न करणार. ज्यांना ज्यांना हें पसंत नसेल त्यांना त्यांना माझें राज्य सोडून जाण्याला मार्ग मोकळा आहे. सांगा--कबजी, राणोजी,

मी करीन ती गोष्ट तुम्हांला मान्य आहे किंवा नाहीं ?

**कलुषा :** महाराजांचा एवढा दांडगा निर्धार असल्यावर आम्हीं ह्या पायांच्या चाकरांनीं विरोध कसा आणि कां म्हणून करावा !

**संभाजी :** राणोजी, तुम्ही कां आतां गप्प राहिला ? बोला,—मी कमळजेला माझी राणी करणार हें तुम्हांला मान्य आहे कीं नाहीं ?

**राणोजी :** कबजीसारखा तोंडपुजेपणा माझ्या गांवीं नाहीं—मला तें साफ मान्य नाहीं.

**संभाजी :** मान्य नाहीं ना ?--कबजी, यांची जहागीर जप्त करा, आणि यांचें सप्त-हजारीचें अधिकार काढून घ्या.--राणोजी, आज तुम्ही पुन्हा पूर्वपदावर येऊन ठेपलां. ना मुलूख ना मनसुभा अशा कंगाल म्हाताऱ्या. अजून तरी शुद्धीवर ये !

**कलुषा :** महाराजांनीं कृपा करून अंमळ शांतपणा धारण करावा. मी राणोजी-रावांची समजूत घालतों. ( संभाजीला बाजूला घेऊन कानांत कांहीं सांगतो. )

**संभाजी :** कबजी, तुमची भीड म्हणून मी एकवार यांची गय करतों. तानाजीची आणि यांची भेट होऊन तानाजी यांच्याविषयीं माझ्यापाशीं थोरपणाचा एक शब्द बोलला तरी मला पुरे आहे.

**कलुषा :** तें सर्व कांहीं मी करतों. तोपर्यंत महाराजांची आणि तानाजीची भेट न झालेली चांगली. आणखी अंमळशानें मी सर्व गोष्टी महाराजांच्या मनाजोग्या घडवून आणून दोघांनाही महाराजांच्या दर्शनाला घेऊन येतोंच.

**संभाजी :** ठीक आहे. राणोजी आणि तानाजी या दोघांचेंही भाग्य बलवत्तर असेल तर परमेश्वर तुमच्या शब्दाला यश देईल ! [ जातो.

**कलुषा :** राणोजीराव, तुम्हीं बुवा फारच तापट आणि उतावळे. आपल्या ध्येयाकडे दृष्टि देऊन या वेळीं तुम्हीं जरा नमत्या नुरानें वागावयाला हवें होतें. ही वेळ गेली तर गेली. आतां यापुढें तरी ध्यानीं ठेवा.

**राणोजी :** ठीक आहे. यापुढें ध्यानीं ठेवतों. आणि तुम्ही सांगतां त्याप्रमाणें नमत्या नुरानें वागतों. उरीं मारायची ती सुरी मारायची पण सोन्याची सुरी मारायची !

**कलुषा :** आतां कसें बोललां !

**राणोजी :** पण आतां महाराजांचे आणि तुमचें आपसांत काय ठरलें ?

**कलुषा :** तेंच तुम्हांला चार शब्दांत सांगावयाचें आहे. तें एकांतांत आणि तानाजीची तुमच्यापाशीं भेट होण्यापूर्वीं सांगायचें आहे, असें जरा बाहेर या. [ जातात.

[ बंदिवान् **तानाजीला** घेऊन **जोत्याजी** प्रवेश करतो. ]

**तानाजी :** जोत्याजी, मी रायगडीं बंदिवासांत असतांना ऐकत होतों, कीं महाराजांना सांगून कबजी मला कडेलोटाची शिक्षा देवविणार आहेत. ती शिक्षादेखील सौम्य ठरेल म्हणून महाराजांनीं रायगडापासून इथवर माझी धिंड काढली कीं काय?

**जोत्याजी :** महाराजांनीं तुला मुद्दाम इकडे आणविलें ते तुझा कडेलोट करण्यासाठीं आणविलें नसून तुला न्याय देण्यासाठीं आणविलें असलें पाहिजे.

**तानाजी :** मला न्याय महाराजांकडून मिळाला तेवढा पुरे झाला! आतां लौकर मरण यावें एवढाच न्याय मीं देवापाशीं मागतों आहें.

**अघटित विभुलीला । मनुजा लोटुनि भवीं मुकवि सुखलवाला ॥ध्रु०॥**
**दैवपाश गळिं पडला । यत्न तिथें हो दुबळा । भवपथीं जन कुंठितमति**
**झाला । मुकत सुख यशाला ॥१॥**

[ **कमळजा** प्रवेश करते ]

**कमळजा :** दादा —दादा!

**जोत्याजी :** कोण? कमळजा!

**तानाजी :** ( आवेशानें ) कोण कमळजा?—जोत्याजी, माझा हात मोकळा नाहीं हो! तुमची तरवार घ्या आणि एका घावासरशीं एका कमळजेच्या दोन कमळजा करून टाका, किंवा मला तरी या क्षणीं ठार करा. कांहींतरी करा, पण आम्हां दोघांना यापुढें एक क्षणभर देखील या एका जगांत नांदूं देऊं नका!

**जोत्याजी :** चांडाळणी, या वेळीं तूं इथें कशाला आलीस?

**कमळजा :** मीं तुमच्या पायांपाशीं-दादाच्या पायांपाशीं क्षमा मागून केल्या कर्माचें प्रायश्चित्त घेण्यासाठीं आलें आहें.

**तानाजी :** केल्या कर्माचें प्रायश्चित्त मरण. जा-मर जा.

**जोत्याजी :** तानाजी, उघड्या डोळ्यांनीं असले प्रसंग पहाण्याची पाळी येते तेव्हां विवेकाचे कातडें डोळ्यांवर ओढून मन शांत ठेवावें लागतें.

**तानाजी :** पण मी डोळे झांकून घेतल्यानें दुनिया आमच्या बेअब्रूकडे थोडीच डोळेझांक करणार आहे!

**जोत्याजी :** आणि कमळजा किंवा तानाजी मेल्यानें दुनिया थोडीच मरणार आहे! तानूबाळ, जग हे असेंच चालायचें!

**तानाजी :** जग हें असेंच चालायचें ! रयतेच्या लेंकी आपल्या कुलशीलावर पाणी सोडून राजांच्या रांडा व्हायच्या ! बहिणीनें भावाला ठार करून त्याच्या प्रेताच्या शय्येवर व्यभिचाराचा विलास करायचा ! हें असेंच जग चालायचें ! म्हणूनच केव्हां एकदां या जगावेगळा होईनसें मला झालें आहे !

**कमळजा :** दादा, मला केल्या अपराधाची क्षमा करशील का !—जोत्याजी, दादाची समजूत करा कीं,पूर्वीची ती कमळजा आतां राहिली नाहीं.अधर्माच्या अंधेरांत राजांशी करूं नये तें पाप करून आपल्या बेताल चालीनें बेचाळीस पिढ्यांना नरकांत लोटणारी ती कमळजा रसातळाला गेली; आणि पश्चात्तापाच्या प्रखर अग्नींत भाजून शुद्ध होऊन ही फर्जदांची कमळजा आपल्या भावापाशीं एवढीच दयेची भीक मागायला आली आहे.

**तानाजी :** खबरदार ! एक शब्ददेखील बोलूं नकोस !

**जोत्याजी :** कपाळकरंटे पोरी, करून करून भागली आणि देवपूजेला लागली, त्याप्रमाणें तूं आतां भावापाशीं दयेची भीक मागायला आलीस पण सद्धर्माचें दिवाळखोर बनून अधर्माचे कर्जबाजारी झालेले असे भिकारडे जीव दुनियेच्या दारोदारीं दयेची भीक मागायला लागले तरी दुनिया त्यांच्या पदरीं दयेचा मूठ पसा न टाकतां शिव्याशापाचे निखारे मात्र टाकते. चांडाळणी, जसें करावें तसें भरावें. माणसानें माणुसकीला सोडून पापाचा पसारा मांडला, कीं त्याचा परिणाम असाच व्हायचा ! हे पहा. तुझे राणूबाबा आले-त्यांना विचार.

[ **राणोजी** प्रवेश करतो. ]

**तानाजी :** कोण, राणूबाबा आले ? राणूबाबा,तुम्ही आल्याची खबर मला सकाळींच कळली. पण मी हा असा परस्वाधीन पडल्यामुळें मला तुमच्या भेटीला येतां आलें नाहीं. बाबा खुशाल आहेत ना ?

**राणोजी :** तुझ्या बाबांची खुशाली ! तानाजी, तुझे बाबा हा लोक सोडून गेले !

**तानाजी :** काय, बाबा वारले ! अरेरे !

**कमळजा :** काय, बाबा वारले ? हाय रे दैवा !

**जोत्याजी :** गंगाजीबाबा वारला ! अरेरे ! फार वाईट गोष्ट झाली !

**राणोजी :** फार चांगली गोष्ट झाली ! जगून तरी त्यानें आपली एकुलती एक लेंक राजाची राखच झालेली पहायची कीं नाहीं ! कमळजे, गंगाजीच्या मरणाला कारण

तूं कुळबुडव्या कारटे, तुझ्या बदकरणीची कहाणी ऐकतांच गंगाजी दुःखाच्या माडभर खोलींत बुडून हाय हाय करीत मेला !

**तानाजी :** बाबा वारल्याचें मला एवढें दुःख वाटत नाहीं. पिकलें पान आज नाहीं उद्यां झडायचेंच पण अशा दुःखांत त्यांना मरण यायला नको होतें. राणूबाबा, बाबांनीं मला कांहीं अखेरचा निरोप सांगितला आहे का ?

**राणोजी :** निरोप आहे. पण तो तुला एकट्यालाच सांगावयाचा आहे. --जोत्याजी, तुम्ही कुणी परके नाहीं. पण महाराजांनीं तानाजीची समजूत घालायची कामगिरी मला सांगितली आहे. त्यासाठीं तुम्ही जरा बाहेर होऊन आम्हांला मोकळ्या मनानें बोलूं द्याल तर मोठी मेहरबानी होईल.

**कमळजा :** ही कामगिरी तुमच्याकडे आली ? देवा, तूं खरा कृपाळू आहेस.

**जोत्याजी :** तुम्हीं खुशाल मोकळया मनानें बोला; माझी हरकत नाहीं. परमेश्वर तुमच्या मुखीं उभा राहून तरी या आततायी पोराचें डोकें ठिकाणावर आणो एवढीच माझी इच्छा आहे.

**राणोजी :** तुमच्या या मायावी राणीसाहेबांना देखील जरा तुमच्याबरोबर बाहेर घेऊन जा. ( कमळजा व जोत्याजी जातात ) ताना, गंगाजीच्या अखेरच्या निरोपाची अक्षरशः अंमलबजावणी करायच्या कामीं तूं मला मनोभावानें हातभार लावायला तयार असशील तर निरोप सांगतों.

**तानाजी :** मी हा असा परस्वाधीन ! मी तुम्हांला कसा हो हातभार लावूं ! पण देवानें मला स्वाधीनता दिली तर बाबांची अखेरची इच्छा पूर्ण करण्यासाठीं मी माझ्या जिवाची रया करायलाही मागेंपुढें पहायचा नाहीं. सांगा, काय निरोप आहे ?

**राणोजी :** परस्वाधीनपणाची एवढी एकच अडचण असेल तर– हा पहा मी तुला स्वाधीन करतों ! ( बंध सोडतो. ) ऐक, संभाजीराजानें कमळजेला भ्रष्ट करून फर्जंदांचें कूळ बुडवलें त्याचा सूड तूं घे, तेव्हांच फर्जंदाचें नांव सांग अशी गंगाजींची तुला अखेरची आज्ञा आहे. ती तूं अक्षरशः पाळली पाहिजेस. ती तुला कशी पाळतां येईल याचा पूर्ण विचार मीं कबजींच्या साहाय्यानें आतांच केला आहे. असा चेहरा गोरामोरा करूं नकोस. लक्षांत ठेव, तुझ्या वतीनें मी तशी हमी घेतली तेव्हांच गंगाजीच्या पिंडाला कावळा शिवला !

**तानाजी :** तुम्ही माझ्या वतीनें ही अगदीं खोटी हमी घेतलीत बाबांची आज्ञा माझ्या प्रजाधर्माच्या आड येत आहे, ती मी पाळणार नाहीं. महाराजांनीं आमचें

कूळ बुडवलें, कबूल ! पण राणूबाबा, राजांनीं राजधर्म सोडला म्हणून प्रजेनें प्रजाधर्म सोडावा काय !

**राणोजी**: राजा प्रजेचें न्यायनीतीनें पालन करायचें सोडून प्रजेच्या मायबहिणींशीं दिवसाढवळ्या व्यभिचार करूं लागला तरी प्रजेनें राजाविरुद्ध ब्र देखील काढूं नये हा प्रजाधर्म काय ?

**तानाजी** : साक्षात् परमेश्वर सृष्टीची नियंत्रणाकरण्यासाठीं सगुण रूपानें अवतार घेतो तोच राजा होतो. राजा प्रजेचा मायबाप, प्रजा राजाची लेंकरें. राजा तारील किंवा मारील राजा प्रजेचा धनी आहे. पण राजाचा धनी कोण आहे ?

**राणोजी** : पण संभाजी आपल्या राजधर्माला जागणारा राजा असेल तर ना? मायबहिणींची ओळख ज्याला नाहीं देवाधर्माचें भय ज्याला नाही, न्यायनीति ज्यांच्या गांवीं नाहीं, असला अरेराव कुलकलंक हा. याला राजा कोण म्हणेल !

**तानाजी** : भलाबुरा कसाही झाला तरी तो राजा ! पतिव्रतेला जसा पति तसाच प्रजेला राजा हें परब्रह्म होय.

**राणोजी** : रावण राजा होता, जरासंध राजा होता, कंस राजा होता,-पण हे राजे मदांध बनून राजधर्माला पायाखालीं तुडवून प्रजेला गांजूं लागले. म्हणून त्यांचा देखील शेवटीं वध झाला; आणि त्यांचा वध करणारांवर देवांनींही फुलें उधळली.

**तानाजी** : रावण-जरासंध-कंस या राजांचा वध करणारांवर देवनीं फुलें उधळली खरीं; पण त्यांचा वध देवानींच स्वतः अवतार घेऊन केला. त्या लोकोत्तर परमेश्वरी लीलेचा पार आपणासारख्या पामरांना कसा लागेल ?

**राणोजी** : एकूण संभाजीराजावर सूड घ्यायला तूं तयार नाहींस ?

**तानाजी** : नाहीं. इतकेंच काय; पण असा राजांचा दुष्मन कुणी आढळला तर त्याला मी पहिल्यानें या जगांतून नाहींसा करीन !

**राणोजी** : समज, मी राजांचा दुष्मन आहे !

**तानाजी** : तर मग मी तुमचा दुष्मन आहे. राणूबाबा, राजांनीं शिर्क्यांना जिवें मारलें तर एक घराणें बुडालें ! कमळजेला राजांनीं बुडवली तर एका घराण्याची अब्रू गेली. पण आम्हीं आज राजांवर संकट आणून त्यांच्या जिवाचें कांहीं बरेवाईट झालें तर तुमच्या आमच्यासारख्या कोटमाप घराण्यांचा पोशिंदा नाहींसा होईल; आणि हा सारा महाराष्ट्र अनाथ होईल.

**राणोजी** : बस्स! मला महाराष्ट्राची पर्वा नाहीं; महाराष्ट्राच्या पोशिंद्याचीही पर्वा नाहीं !

**तानाजी :** तर मग मला तुमचीही पर्वा नाहीं. तुमची माझी ओळख इथेंच संपली खबरदार पाऊल उचलाल तर ! महाराजांना वर्दी देऊन आतांच्या आतां मी तुम्हाला कैद करायला लावणार.

**राणोजी :** तूं आणि मला कैद करायला लावणार ? तसें असेल तर मला तरी तुझी ओळख कशाला हवी ? हा पहा मी माझ्या वाटेंतला कांटा असा दूर करतों. ( तानाजीवर वार करतो. )

[ **कमळजा** प्रवेश करते. )

**कमळजा :** चांडाळा ! काय केलेंस हें ! दादा-दादा ! तुझ्या जीविताची काय रे दुर्दशा झाली ही !—जोत्याजी, धांवा हो धांवा ! अगोदर या काळसर्पाला अडवा !

**राणोजी :** या वेळीं जोत्याजीच काय पण त्याच्या देवाचाही देव आला तरी त्यालादेखील तुडवून जायला हा राणोजी कमी करणार नाहीं. ( जाऊं लागतो. )

[ **जोत्याजी, निराजी** व **पिराजी** प्रवेश करतात ]

**जोत्याजी :** पकडा—पकडा त्याला ! हरामखोरा ! कुठें चाललास ?

[ राणोजी तरवार उगारणार तोंच त्याला जोत्याजी मानगुटीला धरतो. पिराजी व निराजी त्याचे दोन्ही हात पकडतात व घेऊन जातात. ]

**तानाजी :** माझ्या डोळ्यांदेखत महाराजांचा हाडवैरी पकडला गेला; आतां मला सुखानें मरण येईल ! कमळजे, तुला अखेरचें सांगणें एवढेंच, आजवर झालें तें होऊन गेलें. त्या पापांची फेड म्हणून तूं राणीची क्षमा मागून महाराजांवरची मोहिनी काढून घे; आणि—माझ्याच्यानें जास्त बोलवत नाहीं—तूं फर्जंदाची औरस लेक असशील तर तुला कुणाची राख-म्हणवून घेण्यापेक्षां मरणांतच भूषण वाटलें पाहिजे. हेच माझे अखेरचे शब्द !.... ( मरतो. )

**: : २ : :**

[ रस्ता. **निराजी** व **पिराजी**हे राणोजीला बंदिवान् करून नेत आहेत तोंच **संताजी** दुसऱ्या बाजूनें प्रवेश करतो. ]

**संताजी :** राणोजी, कबजींनीं तुम्हांला बंधमुक्त करण्यासाठीं मला इकडे पाठविलें आहे.

**राणोजी :** शाबास कबजी ! तुम्हीं मात्र वेळ राखली खरी. तरी मी मनांत आश्चर्य करीत होतों, अजून यांनीं दाद कशी घेतली नाहीं !

**संताजी :** महाराजांना भेटून सारी निरवानिरव करायला त्यांना थोडा वेळ लागला. यांना तावडतोब मोकळें करा.

**निराजी :** काय रे पिराजी, यांना मोकळें करायचें का ?

**पिराजी :** हो ! आतां न करून काय करणार !

**निराजी :** माझ्या मनांत होतें, यांना असेंच मुसक्या बांधून महाराजांपाशीं न्यावें. तिथें कमळजा व राणीसाहेब असतील, गजराही असेल; विशेषतः गजरेनें आमची ही बहादुरी पहायला हवी होती ?

**संताजी :** बेवकूब ! तुमची गजरा गेली मसणांत ! आणि तुम्हीही जा तिच्या बरोबर ! बऱ्याबोलानें सांगितलेलें ऐकतां कीं दाखवूं चौदावें रत्न ? ( तरवार उगारतो. )

**निराजी :** अरे पण हो ! भल्या माणसा, एकदम इतका दर्दळीवर कशाला येतोस ! सोड तर सोड ! ( सोडून ) त्यांत आमच्या बाचे काय जातें ? पण गजरेला तूं टाकून बोललास हें मात्र बरें नाहीं केलेंस. याबद्दल तुला जाब द्यावा लागेल.

**पिराजी :** तरी बरें; महाराजांची कडी शिस्त सर्वांना माहीत आहे. थोरल्या राणी-साहेबांना देखील महाराजांनीं कमळजाराणीसाहेबांची क्षमा मागायला लावलें, हे ध्यानीं घेऊन तरी संताजी, तूं त्यांच्या आवडत्या गजरेविषयीं असें बोलायला नको होतेंस.

**संताजी :** बरें—बरें ! जा—जा या गुन्ह्याबद्दल मला गजरेची माफी मागायला लावा, जा. मूर्ख कुठचे ! त्या दीडदमडीच्या बटकुरीची माझ्यासमोर एवढी प्रतिष्ठा सांगायला तुम्हांला लाज नाहीं वाटत ?

**पिराजी :** सांगूं—याचें उत्तर लौकरच देऊं बरें !—चलरे निराजी, असाच अगोदर गजरेकडे चल. [ जातात.

[ **जोत्याजी** प्रवेश करतो. ]

**जोत्याजी :** काय, राणोजी मोकळा सुटला ? ही कुणाची दगलबाजी ? हराम खोरा, ही तुम्ही कारवाई वाटतें ! कोणत्या गुन्ह्याबद्दल मीं याला कैद केलें होतें तें तुला माहीत असतांना तूं याला का मोकळा सोडलास बोल ?

**संताजी :** मी कबजींच्या हुकुमाची तामिली केली. मला दुसरें तिसरें कांहीं माहीत नाहीं. आतां इतक्यांत कबजी महाराजांना घेऊन इथें येतील त्यांना काय विचारायचें तें विचारा. माझ्यावर कां उगाच कातावतां ?

**जोत्याजी :** कबजी येतील तेव्हां पाहीन. तोंवर याला मी मोकळा सुटूं देणार नाहीं ! मीं कबजीच्या सांगोवांगीचा हुकूम मानीत नाहीं.

**राणोजी :** निमकहराम ! म्हणजे कबजींचा हुकूम मानीत नाहीं ! कबजींचा हुकूम जो कोणी मानायचा नाहीं त्याची मान जाग्यावर रहायची नाहीं !

**जोत्याजी :** मान गेली तरी बेहेत्तर, पण मानेसाठीं मी इमान सोडायचा नाहीं ! मी कबजी--बिबजी कोणी जाणत नाहीं. मीं तुला कैद केलें आहे ! महाराजांसमोर न्याय होईतों तूं माझा कैदी आहेस

**संताजी :** हें काय ? कबजींच्या हुकुमावर तुम्ही हुकूमत चालवणार ?

**जोत्याजी :** होय. चालवणार ! अशा आणीबाणीच्या वेळीं मीं कबजी--बिबजी कोणी ओळखीत नाहीं.

[ **संभाजी** व **कलुषा** प्रवेश करतात. ]

**कलुषा :** जोत्याजी, तूं कुणाला ओळखीत नाहींस ?—महाराज, यःकश्चित् हुजऱ्याचा वरचढपणा थेट हुजुरांपावेतों नडतो तो हा असा ?

**संभाजी :** जोत्याजी !

**जोत्याजी :** महाराज !

**संभाजी :** एवढा वरचढपणा करण्याइतकें तुझें काळीज उरफाटें कधींपासून झालें !

**जोत्याजी :** महाराज, काळ उरफाटा झाला कीं काळीजदेखील उरफाटें होतें ? दगडाशीं टक्कर देतांना डोकं दगडाचें करावें लागतें. महाराजांच्या जिवाला अपाय करण्याच्या राक्षसी निश्चयाच्या भरीं पडून राणोजीनें तानाजीचा खून केला म्हणून त्याला मीं कैद केला. अशा गुन्हेगाराच्या गुन्ह्याची पूसतपास न करतां त्याला एकदम मोकळा सोडलेला पाहून या उलटलेल्या काळाशीं तोंड देण्यासाठीं मी काळीज उरफाटें करूं नको तर काय करूं ! कबजींनीं कांहींतरी धोक्याचें राजकारण साधण्यासाठीं आपल्या अपरोक्ष हा हुकूम म्हणून दिला असावा असें मला वाटलें.

**संभाजी :** चूप ! राजकारण हा आमचा विषय आहे. तुझ्यासारख्या हुकमतीच्या हुजऱ्याला त्यांत ढवळाढवळ करण्याचें काय कारण ?

**जोत्याजी :** एकूण कबजींच्या या कृत्याला आपली मान्यता आहे म्हणायची ?

**संभाजी :** होय. कबजींच्या प्रत्येक गोष्टीला माझी पूर्ण मान्यता आहे.

**जोत्याजी :** माझी फिर्याद आपण ऐकून देखील घ्यायला तयार नाहीं ?

**संभाजी :** खबरदार ! माझ्या शब्दावर उलटून बोलतोस ? थोरल्या आबासाहेबांच्या राजवटीपासूनचा नोकर आहेस म्हणून सुटतो आहेस. जा—चालता हो !

**जोत्याजी :** नशीब माझें आणि महाराष्ट्राचें ! [ जातो.

**संभाजी :** कबजी, तानाजीच्या मरणाविषयीं तुम्हीं पुरा तपास केला ?

**कलुषा :** होय. पूर्ण तपासाअंतींच मी आपणाला पुन्हा सांगतों, तानाजीचा खून

झाला नसून त्यानें आततायीपणानें आत्महत्या केली. राणोजी खुनी असते तर त्याना मीं मोकळे सोडलें असतें का ?

**संभाजी :** पण आततायीपणानें त्यानें तरी आत्महत्या कां करावी ? आणि जोत्याजीनें तरी एवढा निक्षून संशय कां घ्यावा ?

**कलुषा :** ही जोत्याजीची दगलबाजी आहे !

**संभाजी :** नाहीं ! जोत्याजी तसा दगलबाज नाहीं.

**कलुषा :** मग जोत्याजीचा कदाचित् तसा गैरसमज झाला असेल.

**संभाजी :** ते खरेंखोटें कांहींही असलें तरी या वेळीं राणोजी निःशस्त्र व असहाय आहेत. अशा वेळीं यांना शासन करणें हें मराठ्यांच्या छत्रपतींचें ब्रीद नाहीं. राणोजी तुम्ही माझे कट्टे दुष्मन आहां हें मी ओळखून आहे. पण कबजींच्या शब्दाला योग्य मान देण्यासाठीं मी तुम्हाला या वेळीं जीवदान देतों आणि तुम्हांला फक्त हद्दपारीची सौम्य शिक्षा फर्मावतों. कबजी, यांच्या मानाला व लौकिकाला धक्का न लावतां यांना आताच्या आतां वेशीबाहेर पावते करून या. [ जातो.

**राणोजी :** कबजी, या वेळीं तुम्हीं मला जीवदान दिलें तुमचे माझ्यावर अनंत उपकार आहेत.

**कलुषा :** त्यांत उपकार कसले? माझें कर्तव्य मीं केलें.आतां पुढच्या बेताविषयीं बोला.

**राणोजी :** पुढचा बेत आपण सकाळींच ठरवला आहे. त्यांत बदल करण्याचें कांहींच कारण नाहीं ना ?

**कलुषा :** तसें कांहीं कारण नाहीं म्हणा ! पण कमळजा पूर्णपणें पालटली असल्यानें सवतीसवती एक होऊन महाराजांना आपल्या मुठींत घेतात कीं काय, असें नवें भय उत्पन्न होऊं पहात आहे ! तसें झालेंच तर येसूबाईसाहेबांच्या निमित्तानें पुन्हा चिटणीस वगैरे कारभारी मंडळींच्या हातीं राज्यकारभाराचीं सारीं सूत्रें जातील आणि आपल्या साऱ्याच बेतांवर पाणी पडेल यास्तव तुम्हीं असेंच जाऊन इलाचीबेगला घाई करायला सांगा. तोंवर या चार दोन दिवसांत मी महाराजांना संगमेश्वरीं आणतों.

**राणोजी :** ठीक आहे. आतां संभाजीराजांच्या राजवटींत अशी हीच आपली शेवटची भेट. येतों. राम-राम. ( जातो.

**कलुषा :** ( स्वगत ) मीं आरंभिलेल्या कपटनाटकाचा शेवट काय होणार हें माझें मलाच कळत नाहीसें झाले आहे. कमळजेला मीं मोठ्या भरवशानें इकडे

आगली ती इतकी पालटेल हें कुणाच्या ध्यानीं-मनींही नव्हतें! पण ती पालटली! राणोजी तरी अखेरपावेतों पालटला नाहीं म्हणजे मिळवली. या नेकजात मराठ्यांना स्वामिनिष्ठेचा समंध केव्हां कसा पछाडील याचा काय नेम सांगावा!

( पिराजी व निराजी दोन बाजूंनीं येऊन त्याचे पाय धरतात. )

**पिराजी** : हुजूर-हुजूर! आम्हांला या मराठशाहींत दाद पाहिजे आहे!

**निराजी** ( हात जोडून ) हुजूर! राणोजींना आम्ही राजवाड्यांत घेऊन चाललों असतांना संताजीरावांनीं आमचा अपमान केला! त्यांची आम्हाला दाद पाहिजे आहे

**कलुषा:** संताजीनें तुमचा काय अपराध केला? तो तुम्हांला कांहीं टाकून बोलला कीं काय?

**पिराजी** : होय हुजूर!

**निराजी:** ( वेडावून ) होय हुजूर! 'होय हुजूर' काय! तुझी जन्मभर नुसता सांगकाम्या हुजऱ्याच रहाण्याची लायकी आहे असें गजरा म्हणते, तें कांहीं खोटें नाहीं. हुजूर, संताजीरावांनीं आपला शब्द म्हणजे दर्यामें खसखस म्हटलें. ( एकीकडे-पिराजीला ) असें तिखटमीठ लावून सांगावें लागतें! नुसतें सांगकाम्या राहून भागत नाहीं!

**कलुषा** : असें काय? मग तुम्हांला बरोबर राग आला.

**निराजी** : माझें पुरतें ऐकून तर घ्या हुजूर! आपणाला संताजीराव दर्यामें खसखस म्हणाले, मग मीं त्यांना महाराजांचें भय घातलें. तेव्हां 'महाराज कुठच्या झाडाचा पाला' असें ते म्हणाले. हुजुरांच्या आणि महाराजांच्या भयालाही संताजीराव भीक घालीनात: तेव्हां त्यांना आम्हीं गजरेचा धाक घातला. तेव्हां ते गजरेला दीडदमडीचे बटकूर म्हणाले!

**कलुषा** : आणि यांत तुमचा अपमान झाला?

**निराजी** : जरूर झाला हुजूर! कां नाहीं होणार? गजरा म्हणजे संताजीराव काय समजतात? थोरल्या महाराणीसाहेबांनीं कमळजा राणीसाहेबांना मागें जरा कुठें फट् म्हटलें, तेवढ्यासाठीं महाराजांनीं थोरल्या राणीसाहेबांना कमळजा राणीसाहेबासमोर नाक घासायला लावलें. त्याच कमळजा राणीसाहेबांची गजरा ही दासी आहे. आणि महाराजांची शिस्त ही अशी कडक आहे. संताजीरावांना आपली शिलेदारी

गाजवायची असेल तर त्यांनीं ती माझ्यासारख्या पुरुषावर गाजवावी. बायकांत ते चालायचें नाहीं.

**पिराजी :** चार जोडे मारून संताजीराव आमची एखाद्या गाढवावरून धिंड काढते तरी मला सहन झालें असतें. पण गजरेचा अपमान. अं हं ! नाहीं सहन व्हायचा !

**कलुषा :** बरें, आतां तुमचें म्हणणें काय ? सांगा लौकर !

**निराजी :** संताजीरावांनीं केलेल्या अपराधाची भरपाई झाली पाहिजे.

**कलुषा :** ती कशी काय व्हायची ?

**पिराजी :** संताजीरावांची शिलेदारी मनसबदारी खालसा होऊन ती आम्हांला मिळाली पाहिजे.

**निराजी :** किती अचरट माणूस आहे हा ! अरे वेड्या, बांगड्यांचा वशिला असल्यावर असल्या मनसबदाऱ्यांना काय तोटा ? यासाठीं पहिल्यानें आपल्या बांगड्या शाबूत राखल्या पाहिजेत.–हुजूर, संताजीरावांनीं गजरेचा अपमान केल्या बद्दल तिच्यासमोर नाक घांसून तिची क्षमा मागितली पाहिजे.

**पिराजी :** हुजूर ! आपल्याकडे याची दाद लागणार नसेल तर आम्ही गजरेमार्फत कमळजा राणीसाहेबांच्या वशिल्यानें थेट महाराजांकडे जाऊं.

**कलुषा :** ( स्वगत ) आतां ही ब्याद जर महाराजांपाशीं गेली तर आधींच महाराज सर्व बाजूंनीं कमळजेपायीं बेदिल झाले आहेत, ते काय करतील आणि काय नाहीं याचा काय नेम सांगावा ! तशी फजिती करून घेण्यापेक्षां आतांच जरा तोंडदेखली पड खाल्लेली काय वाईट ? ( उघड ) ठीक आहे मी संताजीला गजरेची क्षमा मागायला सांगतों.

**निराजी :** आणि आम्हांला खाशा सैन्यांत शिलेदारी—

**कलुषा :** ( डोकें खाजवून ) तुम्हांला खाशा सैन्यांत शिलेदारी—

**निराजी :** हुजूर ! इतक्या फिकिरींत पडायचें कारण नाहीं. आम्ही बांगड्याच्या वशिल्याचीं तट्टे आहोंत !

**कलुषा :** ( स्वगत ) यथा राजा तथा प्रजा ! पण नाइलाज आहे ! सांबाच्या संतापाला बळी पडण्याची पाळी येऊं नये म्हणून नंदीच्या शेंपटाला नमस्कार करावा लागतो तो असा. ( उघड ) बरें आहे. सेनासागरांना सांगून मी त्याचीही व्यवस्था करतों. [ जातो.

**निराजी :** भोळेभाबडे लोक म्हणतात कीं रामनामाचा महिमा अगाध आहे. पण

मी म्हणतों कीं, स्त्रीनामाचा महिमा अगाध आहे. स्त्रीच्या नुसत्या नांवावर अमात्य काय–महाराज काय मारे झुरत आहेत. गजरा भवानी, तुझी धन्य आहे. तं आम्हांला आपल्या पायपोसांपाशीं देखील उभी कां करीनास! नुसत्या रामनामाच्या आधारावर वानरसैन्य रामाचा सेतु ओलांडून लंकेंत गेले; तसा तुझ्या नुसत्या नामोच्चारानें आमचा एवढा मोठा कार्यभाग होतो आहे. पण पिराजी, एवढें मात्र लक्षांत ठेवायचें, संताजी गजरेची क्षमा मागायला येईल तेव्हां त्याला हात जोडायला लावायचे.

**पिराजी :** कबूल.

**निराजी :** नाक घासायला लावायचें.

**पिराजी :** कबूल.

**निराजी :** पदर पसरावयाला लावायचा.

**पिराजी :** कबूल.

**निराजी :** आणि साष्टांग नमस्कार घालायला लावून गजरेपाशीं क्षमेची भीक मागायला लावायचें. मग संताजीचा चेहरा अगदीं पाहाण्यासारखा होईल नाहीं?

**पिराजी :** अर्थात्,! पण हें सारें मी एका अटीवर मान्य करायला कबूल आहें कोणती अट ती तुला माहीत आहेच. तुझ्या माझ्यापुरता विचार करायचा तर तुझ्या दृष्टीनें गजरा आतां—

**निराजी :** परनारी आहे. ती तुझी नारी आहे.

**पिराजी :** बस्स! बस्स! दे टाळी. आतां कसें बोललास! तेवढं एक नातें वजा केलेंस कीं गजरा ही आपणां दोघांनाहीं भाग्याला चढवणारी कामधेनु आहे हें मला देखील कबूल. चल आतां प्रथम आपण त्या उद्योगाला लागूं. [ जातो.

**निराजी :** ( स्वगत ) फुकटच्या शब्दानें दुसऱ्याची बायको तिसऱ्याला द्यायला माझ्या बापाचें काय जातें?–गजरा कामधेनु आहे म्हणे! बेट्या, एकदां जवळ जाच तूं. मग कामधेनु दुध देते कीं, दुधाऐवजीं तुझ्या दांताडावर लाथा झाडते तें दिसेल. [ जातो.

## : : ३ : :

[ विशाळगडावरील एका बुरुजाच्या पायथ्याशीं असलेलें देऊळ. **येसूबाई** प्रविष्ट. ]

**येसूबाई :** विशाळगडीं पाऊल ठेवलं न ठेवलं तोंच तानाजीचा तसा शेवट लागला; आणि राणोजीसारख्या विषारी सर्पाला जिवंत सोडायची तिकडे बुद्धि झाली.

**काय दशा ही देवा ! भाळीं योजियलीं ! मी दिना; गांजिसी कां रे
॥ ध्रु० ॥ नृपकरिं वैरि हा तारोनि नाशा कां योजिले त्वां रे ॥ १ ॥**

[ जोत्याजी प्रवेश करतों. ]

जोत्याजी, अखेर महाराजांनीं राणोजीला मोकळे सोडलें हें खरें ना?

**जोत्याजी :** होय आईसाहेब, मीं आपल्या परीनें खूप यत्न केला; पण फुकट !

**येसूबाई :** राणोजी आतां मोगलांना मिळून मराठशाही उलथून पाडणार आहेत म्हणे ! दैव आमचं !

**जोत्याजी :** दैवावर हवाला देऊन हळहळत बसायची कठीण वेळ आतां येऊन ठेपली आहे खरी. परिस्थितीच्या कोंडमाऱ्यांत दैव बलवत्तर झालें कीं प्रयत्न पंगू होतात ते असे. आपण तरी इकडे आल्यासारख्या त्यांना हिताचे दोन शब्द सांगून शुद्धीवर आणाल अशी आशा होती.--पण नाहीं !

**येसूबाई :** मलादेखील तशी आशा वाटत होती.--काल मी इकडे येतांच मुद्दाम माझ्या समाचाराला यायचं झालं, माझ्याशीं मनमोकळेपणानं बोलायचं झालं. आजदेखील तुमच्याकडून राणोजीविषयींचा प्रकार मला कळल्यानंतर आमची भेट झाली. तेव्हां माझ्या तोंडदेखलं होयदेखील म्हणायचं झालं. पण पुन्हां कबजींनीं नेहमींप्रमाणं कान भरले, आणि हाडवैऱ्याला मोकळा सोडला. आतां या नव्या नव्या प्रसंगांना तोंड द्यायचं तरी कसं ! कमळाबाईचा शब्द तरी मानायचा होता ना ? त्यांना तरी पुन्हा एकदां विनवून पहावं म्हणते.

**जोत्याजी :** थांबा आइसाहेब ! ती पहा, कमळजाच इकडे येत आहे. महाराजांना भोंदून बहकायला लावणारी ती चेटकीण-रायगडच्या राणीला धुळीला मिळवून व्यभिचारी राजविलास भोगायला लालचावलेली ती हडळ यावेळीं इकडे कशाला बरं येत असेल ?

( कमळजा प्रवेश करते. )

**येसूबाई :** जोत्याजी, असं बोलूं नये. शत्रूला देखील संतोष वाटेल अशी वाणी आणि करणीसुद्धा गोड असावी--निदान तुमच्यासारख्या म्हाताऱ्या माणसानीं तरी असं रागाला बळी पडणें बरं नाहीं. या कमळाबाई या बसा. मी आताच तुमची आठवण काढली होती. मी तुमच्यापाशीं एक मागणं मागायला येणार होतें, त्या तुम्हीच आलात बरं झालं.

**जोत्याजी :** काय ? रायगडच्या राणीनें राजांच्या यःकश्चित् एका राखेपाशीं याचना करायची आणि ती मी ऐकून घ्यायची ? नको-नको ! माझे आई ! असले अभद्र

बोल पुन्हा बोलूं नकोस. तूं महाराष्ट्राची राजलक्ष्मी आहेस. काय मागावयाचें तें आपण देवापाशीं मागूं! देव आपणाला सज्जनतेच्या करणीसाठीं सहस्र नागांचें बळ देईल; पण ही नागीण तुला फुकाच्या बोलाचेंदेखील बळ न देतां तुझा चावा मात्र घेईल.

**कमळजा :** जोत्याजी, तुम्ही म्हणतां ती नागीण आपलं विष आपणच पिऊन मरून गेली. राणीसाहेब, आजवर आपणाला नानापरींनीं छळणारी ही कमळजा आज आपल्या पायांपाशीं केल्या अपराधाबद्दल क्षमेची भिक्षा मागायला आली आहे. ( हात जोडते. )

**जोत्याजी :** हें मी काय पहातों! वाघिणीला आपल्या क्रूरपणाचा विसर पडला? अमावास्येच्या अंधाराचें काळें तोंड पौर्णिमेच्या शुभ्र चांदण्यानें उजळलें? फत्तराला फुलें फुललीं हें मी काय पहातों!

**कमळजा :** देवानें करणी केली कीं वाघिणीची गरीब गाय होते. आणि फत्तरालाही फुलं फुलतात. जोत्याजी, तुम्ही म्हणालांत तें खरं आहे. राणीसाहेब, ही पाषाण-हृदयी कमळजा आजवर आपल्याशीं इतक्या निष्ठुरपणानं वागली कीं, तें पाहून पाषाणालाही पाझर फुटला असता! रायगडची राणी व्हायच्या लोभाला बळी पडून मी रायगडीं आलें ती राजांची राख होऊन आपल्या राशीला बसलें! आपण परम-पुण्यवंत साध्वी; आपल्या पायांतळच्या धुळींतला कण होऊन रहाण्याइतकी देखील जिची पात्रता नाहीं, त्या पापिष्टेच्या पायांपाशीं या रायगडच्या राणीला मस्तक नमवावें लागलें. रायगडी पाऊल टाकल्या घटकेपासून हरघडी आपणाला परोपरीनं गांजून मी धाई धाई रडवलं. त्या आपल्या अश्रूंच्या पुरांत पर्वतासारखे पाषाण देखील विरघळून गेले असते. पण त्या आपल्या अश्रुगंगेचं तीनात्रिकाळ सचैल स्नान करूनदेखील माझ्या पाषाणाच्या हृदयाला पाझर फुटला नाहीं. पापाचरणाची धुंदी माझ्या डोळ्यांवर आली होती. त्या धुंदींत मला कूळ आठवलं नाहीं, शील आठवलं नाहीं, बाप दिसला नाहीं, भाऊ दिसला नाहीं, पण माझ्या नाशाचं झगझगीत अंजन परमेश्वरानें माझ्या डोळ्यांत घातलं. आतां माझे डोळे उघडले. माझ्या हृदयाच्या पाषाणाला हा अश्रूंचा पाझर त्यानं फोडला. या फत्तराला फुलं त्यानं फुलवलीं. या अश्रूंच्या पाण्यानं आपले पाय धुवून त्या फुलांनीं आपली पूजा करून ही कमळजा आपणापाशीं पदर पसरून भिक्षा मागते आहे; राणीसाहेब, मला केल्या अपराधांची क्षमा करा. ( पायावर मस्तक ठेवते. )

**जोत्याजी :** करा आईसाहेब, तिला क्षमा करा. आपल्या आशीर्वादानें तरी ती केल्या पापापासून मुक्त होऊं दे.

**येसूबाई :** त्यांत क्षमा कसली करायची !–पण तुमचा आग्रहच आहे तर मी तुम्हांला क्षमा केली आहे. आतां तरी झालीना तुमची समजूत ? उठा आतां. ( उठवते. )

**कमळजा :** जोत्याजी, तुमचे देखील मी अक्षम्य अपराध केले आहेत. तुम्हींही मला क्षमा केली पाहिजे.

**जोत्याजी :** आईसाहेबांची तूं क्षमा मागितलीस, त्यांनीं तुला क्षमा केली; त्यांत सर्व कांहीं आलें. आतां मला तुम्हां दोघींपाशीं येवढेंच मागणें मागायचें आहे— दोघीही आपलें दिल एक करून महाराजांना मार्गावर आणा.

**येसूबाई :** जोत्याजी, तुमच्या मुखानं देव बोलला. कमळजाबाई, मी तरी तुमच्यापाशीं हेंच मागणं मागणार होतें. महाराजांच्या पायीं तुमच्या आयुष्याचं मातेरं झालं हें जरी खरं आहे, तरी तें आतां तुम्हीं मनावर घ्यायचं नाहीं.

**कमळजा :** नाहीं–बाई, महाराजांनीं मुळींच माझ्या जन्माचं मातेरं केलं नाहीं, मी स्वतः आडवाटेला जाऊन सर्वस्वाचं वाटोळं करून घेतलं त्यांत त्यांचा काय दोष ! माझ्यामुळं त्यांच्या थोर नांवाला व्यर्थ नामोशी मात्र लागली. महाराजांच्या नांवाला लागलेला तो डाग माझ्या रक्तानं तरी धुतला जाईल का हो ?

**येसूबाई :** असं भलतंसलतं बोलूं नये. महाराजांच्या प्रेमापेक्षां थोर तुम्हांला काय आहे ? तुम्हांला राणी करायचं महाराजांच्या मनांत आहे, त्याला मी अजूनदेखील आड यायची नाहीं ! तुम्ही राणी व्हा, मग आपण दोघीजणी गुण्यागोविंदानं आपल्या सौभाग्येश्वराची सेवा करूं..

> **रुक्मिणी भामा कशा त्या सोडिती सापत्नभावा । प्रेमभावें एकरूपा लक्षिती सौभाग्यसेवा ॥ ध्रु० ॥ गोकुळींचा चक्रपाणि भाळला सेवाबला । तोषवूं तैशाच आम्ही आमुच्या सौभाग्य-देवा ॥ १ ॥**

**कमळजा :** नको–नको. राणीसाहेब, आपल्या या कनवाळूपणाच्या मेरुमांदरांचा माझ्या माथीं भार होतो आहे. आपल्या या उपकारांची फेड मी कशी हो करू ?बाई, मी राणीं व्हायची नाहीं, माझ्या पापी स्पर्शानं मी रायगडच्या राणीचं पवित्र सिंहासन विटाळायची नाहीं, इतकंच काय, पण ही रायगडच्या राणीची

स्वत असं माझ्याकडे बोट दाखवायला देखील जगाला यापुढे संधि मिळूं नये असं मागणं मी देवापाशीं मागतें आहे.

**येसूबाई :** तुम्हीं असं कसं बोलतां! महाराज असल्यावर तुम्हांला काय कमी आहे?

**कमळजा :** (स्वगत) आतां यांच्याशीं खोटं बोलल्याशिवाय गत्यंतर नाहीं. (उघड) आपण सांगतां तें मला सर्वस्वीं मान्य आहे. या शुभ दिवसाची आठवण म्हणून आपण आज जोडीनं महालक्ष्मीच्या दर्शनाला जाऊं. आपण महाराजांना सांगून त्यांना घेऊन या.

**येसूबाई :** आतां कसं बरं बोललां? आतां मी महाराजांना घेऊन येतें. [ जाते.

**कमळजा :** (स्वगत) या गेल्या, बरं झालं! आतां त्या यायच्यापूर्वीं मला या जगाचा शेवटचा निरोप घेतला पाहिजे. (बुरूज चढतांना) माझ्या पापराशीं प्रेमळपणानं पोटीं घालून मला देहान्तप्रायश्चित्तानं पावन करायला समर्थ असलेला हाच तो बुरूज. महान अपराध्यांचा कडेलोट याच बुरुजावरून करतात म्हणूनच लक्ष्मीबुरूज हें नांव ऐकतांच ऐकणाऱ्यांच्या अंगावर शहारे उठतात. ती पलीकडच्या टेकडीवर माझ्या दादाची चिता. माझी पाप देहान्तप्रायश्चित्ताविणं फिटणें शक्य नाहीं. मला या क्षणींदेखील आठवण करून देण्यासाठींच कीं काय ती चिता अजून धुमसते आहे. कपाळकरंट्या कमळजे, तूं आपल्या पापाचरणानं जन्मदात्या बापाचा बळी घेतलास, पाठिराख्या भावाचा बळी घेतलास, आणि राजांची राणी व्हायला आलीस तीं रक्षा होऊन स्वतः सर्वस्वाला मुकलीस! बाबा, तुम्ही देवांच्या पंगतीला बसला असतांना या कुळबुडव्या कमळजेचे जन्मदाते म्हणून आपणांकडे कुणी बोट दाखवितांच आपणांला लाजेनें खालीं मान घालावी लागत असेल. —माझा दादा देवलोकीं जातांना मार्गांतले येते जाते उतारू त्याला हिणवीत असतील, कीं बहिणीच्या बेशरमपणाला कंटाळून भूलोकांतून देवलोकीं चाललेला हा कमळजा नांवाच्या व्यभिचारिणीचा भाऊ!—माझी आई देवांगनांच्या मेळ्यांत बसलेली असतांना डोळ्यांना पदर लावून रडत असेल, कीं या कुळबुडव्या पोरीनं माझ्या पोटीं येऊन माझा कुसवा फुकट विटाळला. —स्त्रीजातीचा जीव त्यांच्या अब्रूत असतो. त्या अब्रूला जी स्त्री एकवार आंचवली ती जगांत जिवंत असूनहि मेली. असं मेलेलं जिणं जगवून जगांत जास्त दुर्लौकिक करून घेण्यापेक्षां मरून नवा जन्म घेतलेला काय वाईट!--राणीसाहेब, या जन्मीं मी चांडाळणीनं आपला

अमानुषपणं छळ केला, त्याची दिव्य मातृप्रेमाच्या तपश्चर्येनं निवृत्ति करण्यासाठीं मी देवापाशीं आपल्या उदरीं नवा जन्म मागणार आहें —अगबाई ! महाराज आले. आतां एका क्षणाचाही विलंब लावतां उपयोगी नाहीं. ( हात जोडून ) परमेश्वरा, राजाराणींना सुखांत ठेव.— धरणीमाते, तूंच या साऱ्या स्थिरचर सृष्टीची माता. तूंच मला जन्म दिलास, आतां तूंच मला उदरीं घे,— जय जगदीश ! ( उडी मारते. )

## ४

:: १ ::

( संगमेश्वराच्या किल्ल्यांतील एक जंगल रस्ता. **निराजी** व **पिराजी** यांना ढकलीत **संताजी** पुढें आणतो. )

**संताजी :** पाजी हरामखोर ! मला त्या भटकनभवानी समोर पदर पसरून क्षमा मागायला लावणार होतां नाहीं ? एवढ्याचसाठीं मी महाराजांना सांगून तुम्हांला फितूर ठरवलें; आणि तुम्हांला झालेल्या शिक्षेची अंमलबजावणी करायची कामगिरी माझ्याकडे मागून घेतली. आतां तुमचीं तोंडें काळीं करून तुमची लंगड्या गाढवा-वरून चांगली धिंड काढीन आणि अखेर तुमचा कडेलोट करीन तेव्हांच माझ्या डोळ्यांचें पारणें फिटेल.

**पिराजी :** हा प्रकार गजरेला कळला तर ती याची पुरी खोडकी जिरवल्याशिवाय रहायची नाहीं.

**संताजी :** अजूनदेखील त्या दिडदमडीच्या बटकुराची माझ्यापुढें एवढी प्रतिष्ठा सांगता काय ? थांबा.—तिचीदेखील तुमच्याबरोबरच गाढवावरून वरात काढतों.

( **गजरा** प्रवेश करते. )

**गजरा :** अहो राजेश्री, इतकी नाकाला जीभ कशाला लावतां ? सांगूं का यांना इतका वेळ तुम्ही कुत्र्यासारखें माझ्यापुढें कसें घुटमळत होतां तें ? कां ? आता बोलत कां नाहीं ?

**निराजी :** पिराजी, पालीसमोर विंचू कशी नांगी टाकतो पहा. इथें कांहीं तरी घोटाळा आहे खास !

**गजरा :** बोला ना ! आतां तोंड कां बंद झालं ? मी अशी महाराजांपाशीं जातें आणि जितक्या गोष्टी तुम्हीं प्रेमाच्या धुंदींत मला सांगितल्यात तितक्या साऱ्या

त्यांना सांगतें.-म्हणजे तुमची आणि तुमच्याबरोबरच तुमच्या कबजींचीं काय मत होते ती दिसेल. ही पहा मी निघालें. ( जाऊं लागते. )

**संताजी :** ( अडवून ) अग, अशी रागावूं नकोस ! मी तुझ्याशीं लग्न करून तूं सांगशील तिकडे तुझ्या मागोमाग यायला तयार आहें. मग तर झालें ना ?

**गजरा :** तुम्ही लग्न करालआणखीही कांहीं कराल. पण मी कुठं तुमची बाईल व्हायला तयार आहें ?

**संताजी :** मग मी करूं तरी काय म्हणजे तुझ्या तोंडाचा तोफखाना बंद होईल ? कबजींमार्फत महाराजांपाशीं वशिला लावून तुला झालेली हद्दपारीची शिक्षा माफ करायला लावूं का ? ये इकडे. ( कानांत सांगतो. )

**निराजी :** चोराला सोडून संन्याशाला सुळीं द्यायचा हा न्याय खासा ! खरें पाहिलें तर राजाराणींच्या संसारांत बिघाड करणारी खरी गुन्हेगार ही असतांना हिला नुसती हद्दपारीची शिक्षा,आणि आमचा कांहींदेखील गुन्हा नसतांना आम्हांला कडेलोटाची शिक्षा!

**पिराजी :** अरे बाबा, ही बांगड्यांची करामत आहे---देवा, आम्हांला आडव्या सुडक्याचीं बाईलमाणसें करून आमच्या हातीं बांगड्या कां र भरल्या नाहींस ?

**गजरा :** ( संताजीला ) अहो, मला हद्दपारीची शिक्षा झाली ती माझ्या पथ्यावरच पडली असं मी समजतें. आतां मी जर तुमच्या नांवाचा बोभाटा करायला नको असेल तर तुमच्या हेरगिरीची खूण तेवढी माझ्या हवालीं करा, कीं मीं आपली त्या आधारावर मला जायचं तिकडे जाईन.---कां आहे का कबूल ?

**संताजी :** आहे कबूल.---हा घे माझ्याजवळचा खुणेचा चांद. आतां तरी झालें ?

**निराजी :** नाहीं झालें. संताजी, हिच्याबरोबरच आम्हांला देखील मोकळें सोडीत असशील तर ठीक. नाहींपेक्षां उभ्या रस्त्यानें या भानगडीविषयीं शंख करीत जाऊं याद राखून ठेव !

**संताजी :** तुम्हांलाही सोडतों. पण तुम्हीं उजाडण्यापूर्वी संगमेश्वराच्या वेशीपार झालें पाहिजे नाहींतर माझ्यावर विनाकारण ठपका यायचा !

**निराजी :** त्याची नको तुम्हांला काळजी. गजरे, तूं मात्र आमच्यावर कृपा केली पाहिजेस. अप्सरा ऋषींना कुत्रीं बनवून आपणांबरोबर स्वर्गांत नेत असत असें म्हणतात, तशी आतां तूंच आमची अप्सरा. तूं आम्हांला सांभाळून बरोबर नेलं पाहिजेस.

**संताजी :** गजरे, तुला हें कबूल आहे ?

**गजरा :** आतां नाकबूल करून काय करूं ! एरव्हीं या मेल्यांचीं तोंडं बंद व्हायचीं कशीं ?

**संताजी :** ठीक आहे. तुम्हां दोघांनाहीं मीं सोडून दिलें आहे. पुढचा पल्ला तुमचा तुम्ही पहा.–परनारीचा छंद हा असा परिणामीं घातक असतो. या नखरेल भटक भवानीच्या नखऱ्यांना भुलून मी कबर्जीचीं कारस्थानें हिच्यापाशीं ओकलों नसतों तर माझ्यावर हा प्रसंग कशाला आला असता ! भल्या माणसांनीं कधीं परनारीच्या फंदांत पडूं नये. [ जातो.

**पिराजी :** गजरे, कर आतां तुझा हात इकडे.

**गजरा :** म्हणजे काय ?

**पिराजी :** अग, आतां आपण दोघेही उघड्यावर पडलों आहों. आतां तुझें पाणि-ग्रहण करायला मला कसली हरकत आहे. आपण प्रथम या संगमेश्वरी आपल्या उभयतांच्या जिवांचा संगम करून टाकूं आणि असेच थेट मोगलाईत जाऊं. मोग-लाई म्हणजे कांहीं मराठशाही नव्हे. जातकुळीचें थोतांड तिथें मुळींच नाहीं. मी, तिथें हां हां म्हणतां मोठा रोजगारी होईन आणि आपण दोघे चैनीनें संसार करूं.

**पिराजी :** गजरे, तूं मला माळ घालायला तयार असशील तर तुझ्यासाठीं मी बाटून मुसलमान देखील होईन; आणि बादशहाकडून एकदम बडी सरदारी मिळवीन. औरंगजेब बादशहापाशीं बाटग्या लोकांची फार चहा होते म्हणतात तिकडे हा निराजी बाटून हजरत नीरजुम्लाखान झाल्यावर त्याची बिब्बी म्हणून तोऱ्यात मिरवशील कीं,नाहीं?

**गजरा :** अहाहा ! काय पण एकेकांच्या अकलेचे तारे तुटताहेत! मेल्यानों, संताजी-सारख्या शिलेदाराला देखील मीं पायांतल्या पायपोसासारखं झिडकारलं तीं तुमच्या-सारख्या कुणा नादानाची बाईल व्हायला अडलंय् माझं खेटर !

[ **मिर्झाबेग** प्रवेश करतो. ]

**मिर्झाबेग :** ओ बेवकूब गद्धे ! एक तरफ हो जाव. ए लौंडी ! ये संगमेश्वर गांवके चारों तरफ हमारे लष्करका घेरा पडा हुवा है; और ऐसे शामके वख्त रास्तेमें फिरनेको तुझे डर नहि मालुम होता ?

**गजरा :** अहो, डर कसली त्यांत ? मीही आतां तुम्हां मोगलांच्याच गोटांत चाललें आहे मला तुमचे सुभेदारसाहेब दासी म्हणून पदरीं ठेवून घेतलि का हो ?

**मिर्झाबेग :** ऐ खुपसुरत प्यारी ! ये तेरा खादीम मिर्झाबेग--इलाचीबेग सुभेदारका साला, तुझे अपनी बिब्बी बनानेको तैयार हैं.

**निराजी :** शिंकें तुटलें आणि बोक्याची धन झाली !

**गजरा :** पण तुमचे सुभेदारसाहेब मला पदरीं ठेवून घेणार नाहींत का ?

**मिर्झाबेग :** ओ मगरूर ! सुभेदारके सालेकी बिब्बी बननेकी तुझे शर्म आती है! ठेर. तुझे ऐसीही पकडकर किसी शिद्दी गुलामको फुटी हुई कवडीको भेज डालता हूं !

**निराजी :** सरदारसाहेब, जरा सबूर ! तिला विकायचीच असेल तर मी सबंध शिवराईला विकत घेतों.

**पिराजी :** सरदारसाहेब, तुम्ही ती मला विकाल तर मी सबंध शिवराई देऊन वर तुमचा गुलाम होतों.

**गजरा :** नका--नका. सरदारसाहेब, तुमच्या पायां पडतें. असल्या बेपत्ता जातकुळीच्या भिकारड्या मराठ्यांच्या हातीं मला देऊं नका. त्यापेक्षां मी तुमची बिब्बीच काय, पण दासीदेखील व्हायला तयार आहे.

**नाहिं रे सख्या ! सजणा ! मज तुजविण आतां आसरा मुळीं उरला ॥ ध्रु० ॥ गुलजार तूं भारी । आषक झाल्यें तुझ्यावरी । ही इष्काची मुशाफरी । खूण पटूं दे अंतरीं ॥ १ ॥**

**मिर्झाबेग :** अच्छा ! मेरेसाथ चल ! कल संभाजीको पकडनेको ये सगोन बहोतही अच्छा हुवा. [ जातात.

**पिराजी :** अरे ! ही गेली !

**निराजी :** आणि जातां जातां आमची जातकुळी काढून गेली ! ही आपणां दोघांपैकीं कुणाला तरी सेनासागर करील त्या आशेनें आजवर हिच्या नादीं लागून आम्हीं करूं नये तेंदेखील करायला कमी केलें नाहीं. पण अखेर सेनासागरकी गेली आणि गजराही गेली ! कायसें म्हणतात ना,--बापापरी बाप गेला आणि बोंबलतां ना हात गेला !

**पिराजी :** आणि आतां जीव जायचा प्रसंग आला आहे ! सूर्योदयापूर्वी आम्ही वेशीबाहेर गेलों नाहीं तर आम्हांला गाढवावरून मिरवत मरणघराकडे जावें लागणार आहे. तेव्हां कसेंही करून वेशीपार होईपावेतों तरी त्या भवानीच्या पायाचा आसरा सोडतां कामा नये.---गजरे, ए गजरे. मातोश्री, जरा इकडे पहा तरी !

**गजरा:** ( पडद्यांत ) यायचं असलं तर माझे देवडीवाले म्हणून या. नाहींतर मरा तिथंच !

**निराजी :** देवडीवाले तर देवडीवाले. येथें नाहक मरून जायचें त्यापेक्षां हा रोजगार कांहीं अगदींच वाईट नाहीं !

**पिराजी :** तशांत ती गजेरेसारख्या माशुकाच्या देवडीवरची नोकरी. निदान नेत्र-सुखाला तरी दुष्काळ नाहीं. चला. [ दोघेही जातात.

**: : २ : :**

[ संगमेश्वरच्या किल्ल्यांतील देवालय. **येसूबाई व जोत्याजी** प्रविष्ट ]

**येसूबाई :** जोत्याजी, महाराज देवदर्शनाला अजून कसे आले नाहींत.

**जोत्याजी :** कबजींशीं कसलीतरी खलबतें चाललीं आहेत. तीं आटोपतांच महाराज येतों म्हणाले. पण आईसाहेब, आपण आज इतक्या फिकिरींत कां ?

**येसूबाई :** संकटांचे कडे एकामागून एक आपणांवर कसे कोसळून पडत आहेत तें तुम्ही पाहतच आहां. कमळजाबाईनीं विशाळगडीं आपला तसा घात करून घेतला, त्यामुळें कष्टी झालेल्या महाराजांच्या मनाचा विरंगुळा व्हावा म्हणून इकडे संगमेश्वरीं यायच्या कबजींच्या योजनेला मींदेखील मान्यता दिली. पण इथं शत्रू जबडा पसरून उभा ! त्यांतून देखील मी संकटांना भीत नाहीं; पण खऱ्याखुऱ्या संकटांपेक्षां संकटांच्या छाया पडछायाच मनाला जास्त भेडसावतात.—जोत्याजी पहांटेच्या रामप्रहरीं पडलेलीं स्वप्नं खरी ठरतात असें म्हणतात तें खरं का हो ?

**जोत्याजी :** असें म्हणतात खरें.

**येसूबाई :** मीं आज पहाटेला एक अति भयंकर स्वप्न पाहिलं.

**जोत्याजी :** आपण कसलें स्वप्न पाहिलें ?

**येसूबाई :** मीं आत्तांच्यासारखीच रायगडीं देवपूजा करीत होतें. इतक्यांत देव्हाऱ्यांतली देवी सहस्र सूर्यांच्या तेजानं एकाएकीं चमकूं लागली. त्या तेजानं माझे डोळे दिपून गेल्यामुळं मीं डोळे मिटून घेतें तोंच देवीनं माझ्या पदरानं माझं कुंकू पुसलं. मी नको नको म्हणून विनवीत असतांना तिनं माझ्या मंगळसूत्रालाही हात घालून तें तोडलं. हा अपशकून पहावेना म्हणून मी देवीचे पाय घट्ट धरून तिचा धांवा करूं लागलें तोंच ते पाय माझ्या हातून सुटले, तेजाचा झोत हळुहळू ओसरूं लागला, आणि देवी अंतर्धान पावतांना दुःखानें उसासे सोडीत मला म्हणाली, 'अभागी मुली, आज तुझ्या सौभाग्याचा पाटव फाटला. भविष्यकाळीं तुझ्या वांट्याला येणाऱ्या भोगाची ही भयाण छाया पाहून तरी जागी हो!–हें अमंगळ स्वप्न खोटं ठरणार नाहीं का हो ?

**जोत्याजी :** आईसाहेब, आपणांसारख्या धीरवान् माणसांनीं असल्या अपशकुना-कडे नेहमीं कानाडोळा करावा. आपण महाराष्ट्राची माता !—आपणच जर अशा निराश झालां तर आम्हीं लेंकरांनीं कसल्या आशेवर जीव धरावा? संकटें आलीं, येत आहेत. आणखीही वेळीं येतील. ही सारी देवाची करणी आहे. अशा प्रसंगीं आपल्या हातीं तेवढेंच काय तें असतें, आपण दानत सोडायची नाहीं, धीर खचूं द्यायचा नाहीं. आल्या संकटांशीं सामना द्यायचा तो इथें दानतीच्या सामर्थ्यांचा द्यायचा. शस्त्रास्त्राचें पाणी जिथें फिकें पडतें तिथें दानतीला पाणीदार शस्त्रास्त्राचें मोल चढतें. आपण आपली दानतीची दौलत देवापायीं अर्पण करून त्याची करुणा भाकायची, म्हणजे देव कनवाळूपणानें आपलें संकट निवारण करील.

[ **संभाजी** प्रवेश करतो. ]

**येसूबाई :** जोत्याजी, तिकडे आतांच्या गोष्टी मुळींच सुद्धां बोलायच्या नाहींत बरं !--आज देवदर्शनाला यायला उशीरसा झाला ?

**संभाजी :** तूर्तच्या राजकारणाच्या कांहीं भानगडी मिटवायच्या होत्या म्हणून जरा उशीर झाला.

**येसूबाई :** मग त्या मिटल्या का ?

**संभाजी :** छे त्या कसल्या मिटतात ! उलट त्या अधिकाधिक गुंतागुंतीच्या होत आहेत. आतां बादशाही सुभेदार तहासंबंधीं वाटाघाट करायला यायचा आहे; तो आल्यावर काय होतें, पहावें. बाकी, त्यांत देखील मला फारशी आशा दिसत नाहीं. माझी उघड उघड पडती बाजू दिसत असतांना आम्हांला मानवणारा तह सुभेदार आमच्याशीं काय म्हणून करील ! या बैठकींत सामोपचारानें तह झाला नाहीं तर याच घडीला युद्ध जुंपणार, आणि एकदां युद्ध जुंपलें, कीं त्यांतून मला वर डोकें काढतां येईल असा मुळींच भरंवसा नाहीं. खरोखर यशवंती, या राजेपणाचा, या जगाचा आणि या जन्माचाही मला आतां अगदीं वीट आला आहे.

**जोत्याजी :** महाराज, धीराच्या धडाडीनें अशा प्रसंगाशीं टक्कर दिली पाहिजे. तें मोडून आपणच जर असें दुबळे बोल बोलूं लागलां तर राजवटीचा हा जगड्व्याळ संसार कसा चालायचा ?

**संभाजी:** आतां हा संसार कसला चालतो ! हा संसार आतां मोडायचा. तिकडून सिद्दी छळतो. त्याला पायबंद लावीत होतों तों इकडे बादशहानें असा फांसा

टाकला. राणोजीसारखे घरोब्याचे लोक वरभेदे निपजून शत्रूला सामील झाले आणि माझ्या नाशाचीं कारस्थानें रचूं लागले. पुष्पहार म्हणून कंठीं धारण केले ते साप होऊन कानाचा चावा घेऊं लागले. आतां हा संसार कुणाच्या बळावर चालायचा ?

**येसूबाई :** शेषाच्या माथीं सृष्टीचा भार असतो–तसा राजाच्या माथीं राजवटीच्या संसाराचा भार असतो.—आपण आपलेपणानं हांक मारली तर अजूनही आपणाला आपल्या राजवटींतल्या कर्त्यासवरल्या मातबर मर्दांचा पाठिंबा मिळेल, आणि हा मोडकळीला आलेला महाराष्ट्राचा संसार त्यांच्या आधारावर पुन्हां नीट सांवरुन नव्या जोमानं चालवतां येईल.

**संभाजी :** येसू, माझ्या पापानं कोपलेला देव तुझ्या आशीर्वादाला बळ देऊन तरी मराठशाहीच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवो, म्हणून- हें पहा, मी माझें राजेपण आज तुझ्या पायीं अर्पण करतों, मग तर झाले ? ( जिरेटोप येसूबाईच्या पायांवर ठेवूं लागतो. )

**येसूबाई :** ( जिरेटोप हातीं घेऊन संभाजींच्या माथीं ठेवून ) हें काय भलतंच ? इतका वैताग बरा नाहीं !

**संभाजी :** हा वैताग नव्हे. येसू, तुझ्या पवित्र वाणींत देवाचे देवपण तिष्ठत आहे, त्या देवाचा मीं हा मान राखला. श्रीसमर्थांनीं थोरल्या आबासाहेबांना बोध करून राजयोग शिकविला, तशीच तूंही मला वेळोवेळीं बोध करून राजशासनाची योग्य दिशा दाखवून देत आलीस. गुरुदक्षणा म्हणून थोरल्या आबासाहेबांनीं राज्याच्या सनदा समर्थांच्या झोळींत टाकल्या, तसेंच मींहि माझें राज्य आज या गुरुचरणीं अर्पण केलें आहे. आतां या राज्याची स्वामिनी तूं आहेस.

**येसूबाई :** जोत्याजी, आता कसं हो करायचं ?

**जोत्याजी :** थोरल्या आबासाहेबांच्या वेळीं समर्थांनीं जसें केलें तसेंच करायचें. महाराज, आईसाहेबांच्या वतीनें मी दोन शब्द बोलतों. राजानेंच राजशासन करावें अशी समर्थांची शिकवण आहे. त्या शिकवणींला स्मरून गुरुप्रसाद म्हणून आपणच राज्य चालवा. मात्र गुरुकृपेची खूण म्हणून दरबारचें शिक्कामोर्तब आईसाहेबांच्या हातीं असूं द्या. यापुढें आईसाहेबांच्या शब्दाविरुद्ध राज्यकारभारांत इकडची काडी देखील तिकडे होता कामा नये.

**संभाजी :** कबूल ! थोरले आबासाहेबदेखलि थोरल्या आईसाहेबांच्या सल्ल्यानें

वागत आले म्हणून विजयी झाले. त्यांच्याच पायाची शपथ घेऊन सांगतो. हा संभाजी आजपासून राणीसाहेबांच्या शब्दाबाहेर पाऊल टाकणार नाहीं.

**संसार बहु बिकट; भार्या सुचवि वाट। मानील तिजला; तो जीव तरला ॥ ध्रु० ॥ अविवेक मनिंचा करि आत्मनाशा। तव हित वचन देवि! आधार मजला ॥ १ ॥**

**येसूबाई :** बरं, आतां देवीला फुलं वाहून नमस्कार करावा ना? मी तिला नवस बोललें आहे.

**संभाजी :** मग त्या नवसाची फेड करायला माझी कुठें ना आहे! (देवीला फुलें वाहूं लागतो.)

**येसूबाई :** अं हं! तशी एकट्यानं नाही वाहायची. मीं नवस केला आहे, जोडप्यानं पांच फुलं वाहीन, पांच प्रदक्षिणा घालीन, आणि तुपाची पंचारती पांच वेळां ओंवाळीन. देव माझ्या नवसाला पावला; मला नवस भरल्या मोलानं पावता केला पाहिजे.

**संभाजी :** बरें, तसें करा. (येसूबाई पंचारती हाती घेते. दोघेही प्रदक्षिणा घालतात व फुलें वहातात.)

**जोत्याजी :** अहाहा! अलीकडच्या काळीं हा लक्ष्मीनारायणाचा जोडा हंसून खेळून एक दिलानें वागतांना आजच मी पहातों आहे. एवढें म्हातारपण होईतों जगलों त्याचें आज सार्थक झालें--देवा, माझ्या राजाराणींना उदंड आयुष्य आणि अखंड यश दे, आणि या बोलत्या--चालत्या परब्रम्हाचे पाय पोटाशीं धरून सेवा करतां करतां मला मरण येऊं दे. (पाया पडतो.)

**येसूबाई :** (शेवटच्या प्रदक्षिणेच्या वेळीं घंटा तुटून पडते व तबकांतील कुंकवाचा करंडा लवंडतो तें पाहून चपापून) अरे देवा! अपशकुन झाला!

(**कलुषा** प्रवेश करतो.)

**कलुषा :** महाराज, इलाचीबेग बैठकखान्यांत केव्हांचे येऊन आपली वाट पहात बसले आहेत. आपणासाठीं खोटी आहे.

**येसूबाई :** महाराज, आपणाला माझी विनंति आहे, आपण आजच्या वाटाघाटी रद्द करून त्यासाठीं पुढं दुसरी एखादी वेळ ठरवावी.

**कलुषा :** (स्वगत) माझ्या कारस्थानाचा राणीला सुगावा लागला कीं काय (उघड) असें कां म्हणून?

**येसूबाई :** आतांच अशीं दुश्चिन्हांवर दुश्चिन्हें गेल्या रात्रींपासून मी पहातें आहे. महाराज ही घंटा तुटून पडली ! आजची बैठक तहकूब करावी. माझा शब्द मोडूं नये.

**संभाजी :** ठीक आहे. कबजी, बैठक आजच्या ऐवजी उद्यांची ठरवा.

**कलुषा :** पण महाराज, अगाऊ ठरलेला बेत मोडायला कांहीं कारण तर पाहिजे. नाहींपेक्षां मी इतक्या प्रयत्नांनीं हा योग जुळवून आणला. शत्रूपाशीं माझें हंसें नाहीं का व्हायचें ? अशानें शत्रू चिडून त्याचे परिणामही फार भयंकर होतील. आईसाहेब, मी बोलतो म्हणून रागाला येऊं नका. पण अशा ऐनवेळीं शकुन अपशकुनांचें नसतें थोतांड माजवून महाप्रयासानें जुळत आलेली राजकारणाची घडी विसकटून टाकायची आहे कां ?

**येसूबाई :** आजची ही घातवेळा आहे. या वेळीं तुमचे बेत सिद्धीला जायचे नाहींत.

**कलुषा :** कसे बेत सिद्धीला जात नाहींत तें पहातों ! समजा, तहाची बैठक मोडली तर मी कांहीं हातांत बांगड्या भरलेल्या नाहींत ! त्याच बैठकींत सुभेदाराला कैद करून युद्धाचा पुकारा करूं. आणि बादशाही सैन्याचा पाडाव करून पायाच्या नाहीं तर डोकीच्या वाटेनें आम्हाला हवा तसा तह आमच्याशीं करायला त्याला भाग पाडूं.

**संभाजी :** बरोबर आहे तुमचें म्हणणें. राणीसाहेब, परमेश्वर माणसाला परमयशाच्या प्राप्तीची सोन्याची संधी अशा एखाद्या वेळींच अवचित देऊन पहातो ! अशा वेळीं दुश्चिन्हांचा भ्रामक बागुलबोवा भेडसावूं लागला तरी तिकडे दुर्लक्ष करून प्राप्त झालेल्या संधीचा उपयोग करून घ्यायला आपण चुकतां कामा नये.

**जोत्याजी :** महाराज ! आपण आतांच आईसाहेबांना काय वचन दिलें ?

**संभाजी :** तें माझ्या पूर्ण स्मरणांत आहे. कबजी, आपणाला हवा तसा तह शत्रूकडून लिहून घेतल्यावर तहाचे कागद आमच्या वतीनें शिक्कामोर्तब करण्यासाठीं राणीसाहेबांपाशीं आणायचे. आणि यापुढें हरएक बाबतींत आमच्या ऐवजीं त्यांच्याच हातून शिक्कामोर्तब व्हायचें, हें ध्यानांत ठेवा !

**कलुषा :** जशी महाराजांची आज्ञा !

**संभाजी :** राणीसाहेब, येतों मी. [ दोघेही जातात.

**येसूबाई :** जोत्याजी, तुम्ही तरी जा स्वारीबरोबर. आणि बैठकीचा एकंदर रागरंग

कसा काय आहे तो पाहून या. [ जोत्याजी जातो. ] देवी आई ! आपल्या कृपा-कटाक्षानें आमच्या सर्व दुरितांचा निरास करुन या बैठकींत आम्हांला यश दे.

**धाव विभो सदया श्रीनाथा ! हा वैरी वारा ॥ ध्रु० ॥ विजया वरो राया; अरि पदिं आणा हो ! होऊ सुखी भूमाता; मी जोडीं हात ॥ १ ॥**

[ जाते.

## : : ३ : :

[ **राणोजी** व कलुषा प्रवेश करतात. ]

**राणोजी** : कबजी, शिर्क्यांच्या शिरकाणाचा सूड घेण्याची प्रतिज्ञा या राणोजी शिर्क्यानें पुरी केली; आज माझीं बेचाळीस कुळें उद्धरुन गेलीं. राजाला अखेर मींच पकडून इलाचीबेगच्या स्वाधीन केला. आतां माझी इतिकर्तव्यता झाली. आतां तुम्ही या यशाचे धनी होऊन खुशाल मोगलाई महाराष्ट्राचे सुभेदार व्हा.

**कलुषा** : महाराजांना पकडण्याच्या कामीं तुम्हीं खरोखरच आपल्या शौर्याची शिकस्त केली ! तुमच्या अपूर्व कर्तबगारीबद्दल तुम्हांला बादशहाकडून चांगलीच शाबासकी मिळेल अशी तजवीज मी करीन ! नाहीं म्हणायला आणखी थोडी कामगिरी शिल्लक आहे, तेवढी मात्र तुम्हीं पार पाडली पाहिजे.

**राणोजी** : बादशाही शाबासकीची मला मुळींच पर्वा नाहीं. मी बोलल्याप्रमाणें राजावर सूड घेतला हीच माझी शाबासकी; आणि हाच माझा गौरव ! यापेक्षां आणखी मला कांहींसुद्धां नको आहे ! पण एक कामगिरी कोणती राहिली म्हणतां ?

**कलुषा** : मिर्झाबेगनें ती कामगिरी पत्करली आहे. पण त्याच्या हातून ती पार पडेलच अशी खात्री देववत नाहीं. तुम्हीं राजांना पकडून इलाचीबेगच्या स्वाधीन केलें, त्याप्रमाणेंच राणीलाही पकडून बादशहापाशीं नेऊन गुदरली पाहिजे. बादशहाला रायगडची राणी आपल्या जनानखान्यांत ठेवण्यांत मोठें भूषण वाटेल. आणि तो प्रसन्न होऊन आपण काय मागूं तें आपणाला देईल.

**राणोजी** : नामर्द ! तूं ब्राह्मण आहेस कीं, चांडाळ आहेस ? अस्सल हिंदूच्या तोंडून असले नामुष्कीचे बोल कधींच निघायचे नाहींत. तुझी अवलाद हिंदूचीच आहे का ?

**कलुषा** : एकदम असे एकेरीवर कशाला येतां ? राजांवर पुरा सूड घेण्याची प्रतिज्ञा तुम्हींच केली होती ना ?

**राणोजी :** म्हणजे कांहीं आमच्या आया-बहिणींना बादशहाच्या रांडा बनविण्याची प्रतिज्ञा मी केली नव्हती ! ती साध्वी अशा नादान राजाच्या नांवानें बांटली म्हणून ती माझी मानलेली बहीण असतांही तिच्या ललाटीं वैधव्य माझ्या हातानें लिहिलें गेलें. पण राजा कैद होऊन मरणघराची वाट चालूं लागतांच त्या राणोजी शिर्क्यांचा अवतार संपला ! आणि रायगडच्या राणीच्या इभ्रतीला प्राणांपलीकडे जपणारा हा नवा राणोजी शिर्के जन्माला आला.

**कलुषा :** 'असें काय ? ठीक आहे. राणी तर आतां तुमच्या हातीं मिळणार नाहींच; पण तुमच्या या फितुरीचें प्रायश्चित्त मात्र तुम्हांला भोगावें लागेल. याद राखा ! [ जातो.

[ **जोत्याजी** प्रवेश करतो. ]

**जोत्याजी :** अस्सल बीजाचे मराठे कुणी असाल ते या वेळीं रायगडच्या राणीचें-महाराष्ट्राच्या मातेचें—रक्षण करण्यासाठीं धावून या ! अरेरे ! मांगांनों, चांडाळांनों ! तुम्हींच राजांना दगा दिलात !· आईसाहेबांचा कोंडमाराही तुम्हींच केला आहे. तुम्हीं राजाराणींचे कट्टे दुश्मन आहां, हें ओळखून देखील मी तुम्हांला हात जोडून विनवितों,—बाबांनो, अशा आणीबाणीच्या वेळीं आपल्या जातिधर्माला जागा आणि रायगडच्या राणीची अब्रू राखा ! तुमच्या देखत राणी जर त्या दुष्ट अविंधांच्या हातीं कोंडली गेली तर सारें जग तुमच्या तोंडावर थुंकून म्हणेल, या रांडलेकांनीं मोगलांकडून मिळणाऱ्या मान—वैभवाच्या उष्ट्या तुकड्या-साठीं आपल्या हातांनीं आपली राणी, आपली माय अविंधांच्या घरांत लोटली !

**राणोजी :** राणी, ही मराठमोळ्याची माया—माझी मानलेली बहीण आहे. तिला मी माझ्या देहाच्या पायघड्यांवरून रायगडीं चालवींत नेईन. सांग, राणीच्या रक्ष-णासाठीं मी काय करूं ?

**जोत्याजी :** पाषाणहृदयी निर्दया, तूं आपल्या कसाबकरणीनें मराठमोळ्याच्या नेक-जातपणाचें तोंड काळें केलेंस, आणि तूंच पुन्हा निर्लज्जपणानें आमच्या दुःखावर अशा डागण्या देतोस ! ( तलवार उपसून राणोजीवर चालून जातो.)

**राणोजी :** ( जोत्याजीला आंवरीत ) जोत्याजी, महाराजांबरोबर आज पाऊण तप मांडलेली दावेदारी आतां संपली. अशा आणीबाणीच्या वेळीं मी जास्त कांहीं सांगत नाहीं,–राणीच्या रक्षणासाठीं मी माझ्या छातीची ढाल करून उभा आहे. सांग, या वेळीं राणी कुठें आहे ?

**जोत्याजी :** त्यांच्या महालाला शत्रूचा वेढा पडला असून त्या आंत अडकून पडल्या आहेत ! महाराज तर शत्रूच्या हातीं सांपडलेच ! आतां राणोजी, तूं आईसाहेबांना तरी सोडवून माझ्या स्वाधीन करशील तर मी हनुमानाच्या उड्डाणानें एका भरारींत हां हां म्हणतां त्यांना रायगडीं सुखरूप पोंचत्या करीन. फक्त एकदां त्या मोकळ्या होऊन माझ्या हातीं लागूं देत आणि त्यांच्यासह मला शत्रूच्या गोटापार होऊं दे.

**राणोजी :** ( हातांतील आंगठी काढून) ही आंगठी महालाला वेढा देऊन बसलेल्या शिलेदाराला दाखवितांच तो तुला आंत सोडील. तूं त्यांना सोबत करतोस तोंवर मी बाकीचा जरूर तो बंदोबस्त करून येतों व आईसाहेबांना गोटाबाहेर काढून देतों. [ जातो.

[ दुसऱ्या बाजूनें **कलुषा** व **संताजी** प्रवेश करतात.]

**कलुषा :** तो पहा, राणोजी तिकडे जातो आहे. यावरून राणीसाहेब इथेंच कुठेंतरी लपून बसल्या असाव्यात. त्या त्याच्या हाती लागायच्या पूर्वी आपण त्यांचा शोध' केला पाहिजे.

**संताजी :** मी शेषाच्या मस्तकापावेतों देखील त्यांचा शोध करून त्यांना सुखरूप-पणें आपणांपाशीं आणून सोडतों. पण पुढें त्यांच्या रक्षणाची तजवीज काय करणार ?

**कलुषा :** पुढची काळजी तुला नको.--पण तूं माझा हस्तक असल्यानें त्या खुषीनें तुझ्याबरोबर यायला कितपत तयार होतील हाच प्रश्न आहे.-त्यांना तूं महाराजांची भेट करवून देण्यासाठीं थेट तुरुंगांत घेऊन ये. भेट झाल्यावर त्यांना तिथून रायगडीं सुखरूप पावत्या करण्याची तजवीज मी करतों. एवढें काम तूं करशील तर राणोजी शिर्क्याच्या ऐवजीं तुला मराठशाहींत दसहजारी मनसबदार नेमण्याचें काम माझें !

**संताजी :** मनसबदारी मला मिळो किंवा न मिळो; राणीसाहेबांच्या रक्षणासाठीं जिवाभावाच्या मोलानें झटणें हें माझें कर्तव्यच आहे. [ जातो.

**कलुषा :** बेवकूब ! जिवाभावाच्या मोलानें राणीचें रक्षण करणार, म्हणे ! हा प्रत्यक्ष माझा नोकर असून राजनिष्ठेच्या धुंदींत मलाच नडूं लागला आहे. या मराठ्यांना राजनिष्ठेचें वेड असें पिढ्यान्‌पिढ्या कसें जडलेलें असतें न कळे ! माझ्या मार्गांतला हाही कांटा मला दूर केलाच पाहिजे. पण प्रथम या कांट्यानें मी राणीचा कांटा काढणार, आणि मग दोन्ही कांटे दूर फेंकून देणार. कांट्यानें कांटा काढण्याची कला मला देऊन, देवा तूं माझ्यावर मोठेच उपकार केले आहेस ! [ जातो.

:: ४ ::

[ संगमेश्वराच्या किल्ल्यांतील तुरुंग शृंखलाबद्ध **संभाजी** उभा आहे ]

**संभाजी :** शिव--शिव ! एवढ्या धनंतर मराठी साम्राज्याचा सामर्थ्यवान् छत्रपति आज सर्वस्वीं हा असा दुबळा बनून आपल्या दुष्कर्माचा जाब देवापाशीं देण्यासाठीं काळाच्या जबड्यांत उभा आहे. हें पाहून तरी जगा, सावध हो ! आणि जसें करावें तसें भरावें हा देवाघरचा न्याय ध्यानीं घेऊन माणुसकीला जागून वागूं लाग !--हर हर ! संभाजी, कोणत्या परीनें तुझ्या पापांची ही परवड लागली रे! --मी एका काळीं राजा झालों, त्या घटकेपासून तो आज अविंधांचा जेरबंदी कैदी बनेपावेतों जे अनंत अपराध माझ्या हातून घडले ते सारे माझ्या दृष्टीसमोर आतां तरळूं लागले आहेत. थोरल्या आबासाहेबांच्या राजवटीं अमर्यादा केली. त्याबाबत पन्हाळगडीं कैदेंत असतांना अशींच माझीं पोरपणांतलीं पापें आठवण्याचा प्रसंग माझ्यावर आला होता. त्या चुकांची थोरल्या आबासाहेबांपाशीं माफी मागण्यापूर्वीच त्यांचा काळ झाला, आणि लगेच हा बोलता चालता काळ राज्यतृष्णेनें बेहोष होऊन निर्दयपणें रक्तपाताच्या जोरावर राज-सिंहासन बळकावून बसला ! सत्ता हातीं येतांच सत्याची चाड राहिली नाहीं. त्यावेळीं माझ्या जुलमाआड येऊन राजवटीची अबादानी राखूं पहाणाऱ्या सत्पक्षियांची मीं मानखंडना केली. त्यांचे कहरपणानें बळी घेऊन त्यांचे संसार धुळीला मिळविले. पण त्या जुलमाचे वज्राघात सर्वांनीं मुकाटपणें सहन केले, ते मी राजा म्हणून !-कमळजेसारखी कुलकन्या माझ्यापायीं जन्मांतून उठली: असें असतां ती माझ्या अब्रूवर पांघरूण घालण्यासाठीं स्वतः आत्महत्त्या करून मरून गेली, ती मी राजा म्हणून ! हाच मी राजा नसतों तर लोकक्षोभाच्या वडवानळांत केव्हांच भस्मसात् झालों असतों ! राजा बहकत चालला, त्याच्या हातीं राष्ट्राचा संसार धुळीला मिळूं लागला म्हणून श्रीसमर्थांनीं उपदेश केला-'सकल सुखांचा त्याग करोनी साधिजे तो योग ' —अहाहा ! श्रीगुरु समर्थ रामदास स्वामीमहा-राज ! आपण हा दिव्योपदेशाचा त्रिभुवनाच्या मोलाचा रत्नहार माझ्या माकडाच्या हातीं दिला, तो मी राजा म्हणून ! कोट माप रयतेच्या संसाराचे सार्थक एकवटलें आहे असा राष्ट्राचा संसार राजा या नात्यानें हातीं आला; पण हतभागी कुलकलंका संभाजी, तूं आपल्या नादानपणानें राजा या नांवाला नालायक ठरून त्या संसाराचा मांडव करून घेतलास !

**राणोजी :** ( तुरुंगाचें कुलूप काढून ) महाराज !

**संभाजी :** ( बाहेर येऊन ) राणोजी, तुम्हीं माझ्याविषयीं सर्पासारखा दावा मनांत धरलात तो अखेर पुरा साधलात! दुखावलेल्या सर्पाला जिवंत सोडलें, त्याचें तुम्हीं मला यथायोग्य प्रायश्चित दिलेंत. विश्वासघातानें मला पकडलेंत काय?-नामर्द! षंढ! तुमच्या अंगीं अस्सल मराठ्याचें रक्त खेळत असतें तर तुम्हीं समरांगणावर माझ्याशीं उघड उघड दोन हात करुन जातिवंत मर्दासारखें वैर साधायचें होते.

**राणोजी :** ( स्वगत ) ह्या नरशार्दूलाचे बोल अक्षरशः खरे आहेत. भलत्या मीपणाच्या भरीं पडून मी माझ्या मायदेशाशीं बेइमान झालों; आणि अत्याचारी अविंधांना हिंदवी-स्वराज्याच्या पवित्र देवालयांत घुसवून त्यांच्या हातून ही महाराष्ट्राच्या राजेश्वराची चैतन्यमूर्ति फोडली-हींच जिंदगी उभ्या आयुष्यांत जोडली. प्रतिज्ञा पूर्ण झाली; पण यश पदरीं पडलें तें पाप पदरीं पडलें! ( उघड ) महाराज! मी आपला अनन्यापराधी आहे. मला क्षमा असावी.

[ इलाचीबेग शिपायांसह प्रवेश करतो. ]

**इलाचीबेग :** राणोजी, मेरी इजाजत बगैर संभाजीसे न मिलनेका हुक्म क्यौं तोड डाला? जेलखानेकी कीली तुम्हारे भरोसेपर तुम्हारे सुपूर्द किई, उसका ये नतीजा?

**राणोजी :** सुभेदार, कसूर माफ असावी. मी कसा झालों तरी हाडाचा अस्सल मराठा आहे, आणि हे अलम मराठी दुनियेचे मायबाप आहेत! यांच्या पायांचें दर्शन घेण्याच्या उत्कंठेपायीं आपल्या हुकमाचा मला चुकून विसर पडला खरा.

**इलाचीबेग :** नहीं, नहीं! तुम्हें समज सोचकर ये सर्कशी किअी. तुम् बादशहाके तरफसे फिर गये. रायगडकी रानीको बादशहाके सामने हाजीर करनेका मनसुबा तुम्हें मालुम हो कर रायगड जानेका रास्ता उस्को क्यौं दे दिया?

**राणोजी :** होय! माझ्या राणीला मीं तुमच्या जबड्यांतून वांचवून रायगडीं पाठवली.--मायबहिणीची ओळख नसणाऱ्या चांडाळांपासून माझ्या बहिणीची अब्रू मी बचावली. मग तुमचें म्हणणें काय?

**इलाचीबेग :** इस् गुन्हाकी वझासे बादशहाकी मेहेरबानी खो बैठे.

**राणोजी :** मेहेरबानी--मेहेरबानी म्हणून बादशहा आम्हां मराठ्यांच्या मायलेकींना आपल्या नाटकशाळा बनवूं म्हणेल तर असल्या बादशाही मेहेरबानीला हा राणोजी असा लाथेखालीं तुडवतो.--आतां ह्या भेटीपुरतें बोलाल तर आपल्या अपरोक्ष महाराजांची भेट घेण्यांत माझी चूक झाली; मला कबूल आहे. पण

सुभेदारसाहेब, आम्हां मराठ्यांना आपला राजा परमेश्वराच्या ठायीं पूज्य असतो. त्याचें दर्शन—

**संभाजी :** नका--राणोजी, परमेश्वराचें पवित्र नांव माझ्या अपवित्र नावाच्या सान्निध्यानें असें विटाळूं नका. साक्षात् परमेश्वराचे अवतार असे राजे थोरले आबासाहेब होऊन गेले!–त्यांच्या पोटीं राजेपणाची इज्जत घेणारा हा पापाचा पुतळा जन्माला आला. हा सूर्यापोटीं शनैश्वर उगवला. याला राजा कशाला म्हणता?

**राणोजी :** कर्दमाच्या पुटानीं हिऱ्याचें तेज झाकलें गेलें तरी हिरा तो हिरा! सुभेदारसाहेब, आपण माझ्या साहाय्यानें, विश्वासघातानें महाराजांना कैद केले त्यांची मला प्रथम मुक्तता करूं दे मग तुम्हीं उघड्या रणांगणावर त्यांच्याशी वीराप्रमाणें झुंजून त्यांना कोंडतां आलें तर खुशाल कोंडा. माझी एवढी विनंति आपण मान्य केली नाहीं तर मला नाइलाजानें आपल्याशीं विरुद्ध जावें लागेल.

**इलाचीबेग :** ऐसीं सीराफिरी बातें फिर जबानपर लाओगे, तो तुमको यहांके यहां कैद करना पडेगा!

**राणोजी :** काय तुम्हीं मला कैद करणार?

**इलाचीबेग :** बेशक्!

**राणोजी :** आपली जात, आपला धर्म, आपला देश, आपला राजा, या सर्वांशी बेइमान होऊन मी बादशहासारख्या हिंदवी स्वराज्याच्या हाडवैऱ्याचा पाठपुरावा केला त्याचें हें फळ कांय? क्रूरकर्म्या, अखेर तूंही आपल्या जातीवर गेलास! बरस. माझ्या राजाला मीं सोडवून नेणार. मला अडवायची कुणाची माय व्याली असेल ते पुढे या! ही माझी बिजली तुमच्या रक्ताला तहानलेली आहे!

**इलाचीबेग :** कंबख्त! इसकी प्यास तेरेही खूनसे बुझानीं पडेगी, याद रख! कदम पीछे हटा! संभाजी मेरा कैदी है!

**राणोजी :** खबरदार! माझ्या राजांना तुझे कैदी म्हणून पुन्हा त्यांची अशी मानखंडना करशील तर ती मस्तवाल जीभ या क्षणीं कापली जाईल. या राणोजीच्या कुडींत प्राण असेपावेतों कोण कसा माझ्या राजांच्या केंसाला तरी स्पर्श करतों ते मला पाहूं दे.

**इलाचीबेग :** ऐसा है? तो तेरे राजाका रास्ता सांफ करनेको पहिले तुझेही रवाना करता हूं! शिपाईयों! इस् हरामजादेकी गर्दन काट डालो! ( शिपाई राणोजीवर तुटून पडतात. )

**राणोजी :** ( लढतां लढतां वार लागून पडतो. ) अरेरे !--महाराज ! आपली मुक्तता करणें या अभाग्याच्या कपाळीं नव्हतें त्याला इलाज नाहीं ! पण मला मरण येतें आहे तेंही माझ्या राजांच्या रक्षणासाठीं लढतां लढतां - राजांच्या पवित्र पायांपाशींच येत आहे यांतच मला धन्यता वाटत आहे.-परमेश्वरा,माझ्या राजांचें रक्षण कर!(मरतो.)

**कलुषा :** ( संभाजींच्या वस्त्रालंकारांसह प्रवेश करून ) सुभेदारसाहेब, आपण सांगितल्याप्रमाणें महाराजांचे वस्त्रालंकार मी घेऊन आलों आहें.

**इलाचीबेग :** पहिले ये कहो,--जिस कामके लिये तुमको कहाथा वो किया या नहीं ?

**संभाजी :** हें मी काय पहातों ! कबजीदेखील शत्रूला सामील झाले कीं काय ! कबजी याचा अर्थ काय ?

**कलुषा :** महाराज, आपल्या आणि मराठशाहीच्या रक्षणासाठींच माझी ही सारी धडपड चालली आहे !

**इलाचीबेग :** महाराज, आपको तुलापूर ले जानेका मुझे बादशहाका सख्त हुक्म् है. ये पोशाख पेहेनीये, और राजाओंका तरहा में हम् रहा चलिये. वहां जानेबाद बादशहा खुद आपको देश और राज आपको इनायत करेंगा. मगर इस्लामी महजब आपको कबूल करना पडेगा !

**संभाजी :** शिखानष्टा, सिंहाचा छावा प्राणांच्या आशेनें दांतीं तृण धरून | बुकाला कधींच शरण येत नसतो ! प्राणरक्षणासाठीं मला प्राणांहूनही बहुमोल अशा धर्मावर पाणी सोडायला सांगणाऱ्या नराधमा, मी माझ्या धर्मासाठीं एक वार सोडून सहस्रवार अशा संकटांत उडी घालून प्राण देईन; आणि नित्य नवे जन्म धारण करून तुमच्यासारख्या धर्मद्रोही चांडाळांचें प्राण घेईन !

**कलुषा :** महाराज, भलत्याच वेळीं असा आततायीपणा हिताचा नाहीं.

**संभाजी :** खबरदार, एक शब्द तरी पुढें बोलाल तर ! प्राणासाठीं मला धर्मावर पाणी सोडायची बदसल्ला देतां ? फुकट-फुकट तुम्ही ब्राह्मण कुलांत जन्माला आलांत !

**इलाचीबेग :** धरमके वास्ते जानसे हात धोनेवाले ! अब भी होषमें आव और फकत इस्लामका एकार जबानसे करो ! नही तो हर एक तऱ्हाकी बूरी बूरी हालत तुम्हारी की जाएगी ! और कुत्तेसे मौत मरना पडेगा !

**संभाजी :** माझ्या धर्मासाठीं मला कितीहि यातना सोसाव्या लागल्या आणि कितीही भयंकर मरण आले तरी बेहेत्तर आहे.

**इलाचीबेग :** अभीतक इतनी गुरूर !—बस् ! अब तूं राजा नहीं, काफीर है ! ओ काफीर! तेरे राजापनको खाकमें मिलाता हूं ! ( वस्त्रें पायांखालीं तुडवून ) हमारे इस्लामके सामने हिंदूपनका दिमाख करनेवाले काफिरोंकी मरहट्टेशाही इसी वख्त मेरे पावकी ठोकरसे नेस्तनाबूद हुई !--सिपाइयों ! पकडो इसको, और मेरे साथ ले चलो. ( शिपाई संभाजीच्या दंडाला धरून नेऊं लागतात. )

**संभाजी :** कबजी, माझ्या महाराष्ट्राला माझा शेवटचा निरोप सांगा.--या हतभागी छत्रपतीचे आजवर झाले गेलेले सारे अन्याय उदार मनानें उदरीं घालून हिंदवी स्वराज्याची इभ्रत राखण्यासाठीं तळहातावर शिरें घेऊन उभे रहा;आणि हिंदवी--स्वराज्याच्या जीवितसर्वस्वावर टपून बसलेल्या या अविंधांच्या आसुरी सत्तेचीं पाळेंमुळें खणून काढून आपल्या मायभूमीचे पांग फेडा. बा महाराष्ट्रा ! हा दुर्दैवी छत्रपति तुला अखेरचा प्रणाम करीत आहे ! ( नमस्कार करतो. शिपाई ओढीत नेतात. )

**कलुषा :** हातीं घेतलेलें कारस्थान अर्धें तरी पूर्णपणें तडीला गेलें. पण अजून राणी कशी आली नाहीं !--संताजी तिकडेच गुंतून पडला, हा काय प्रकार आहे ? प्रथम जाऊन चौकशी केली पाहिजे. महाराज तुळापुरीं रवाना झाले ही बातमी षट्कर्णी होण्याच्या पूर्वी राणी आमच्या हस्तगत झालीच पाहिजे. [ जातो-

[ **संताजी येसूबाई**सह प्रवेश करतो. ]

**येसूबाई :** हें काय ? महाराज कुठं आहेत ! त्यांचे वस्त्रालंकार तर इथं पडलेले दिसतात, आणि ते कुठं गेले ? वाटेनें येतांना दुर्वार्ता कानीं आली तीच खरी झाली कीं काय ?—राणोजी त्यांना गोडवायला आले तेही इथं मरून पडले आहेत ! इथं कांहींतरी दगा आहे.–चांडाळा, तूं मला फसवलंस !

**संताजी :** नाहीं आईसाहेब, आपल्या पायांची शपथ, महाराजांच्या पायांची शपथ घेऊन सांगतों, मी आपणांला फसवलें नाहीं. महाराजांच्या सुटकेची तजवीज करून कबजींनीं आपल्या शोधार्थ मला मुद्दाम पाठवलें होतें.

**येसूबाई :** कबजींनीं माझ्या शोधार्थ पाठविलं होतं ?—कर्मचांडाळा,—मग मला हें अगोदरच कां सांगितलं नाहींस ! अरेरे ! विश्वासघातक्या, मला गरीब गाईला त्या कसाबाच्या कसाईखान्यांत कां रे आणून सोडलंस !

( **कलुषा** प्रवेश करतो. )

**कलुषा :** काय ! मीं कसाब ? राणीसाहेब, मला तुम्हीं कसाब ठरवलेंत ? तर मग तुमच्याच भाषेंत सांगतों, मी खराखुरा कसाब आहे. मीं हा इतक्यांतच महाराजांना

कसाईखान्याच्या दरवाजापावेतों पोंचवून आलों; आणि आतां तुमच्याच येण्याची वाट पहात होतों. आतां मी तुम्हांलाही त्याच कसाईखान्यांतल्या दावणीला नेऊन डांबणार आहे

**संताजी :** तर मग–मात्रागमनी दगलबाज ! भोग आपल्या कर्मांची फळें ! (कलुषावर तुटून पडतो. )

**कलुषा :** ( तरवारीचा वार संताजीवर करीत ) माझ्या कर्माचा फळें मी तुझ्यासारख्या भोळसटांना ही अशी भोगायला लावतों !–राणीसाहेब, आतां तरी तुम्ही इथें पूर्ण निराधार आहां ना ! आतां मी हिताचे दोन शब्द सांगतों तें निमूटपणें ऐका.—राजे गेले, मरणघरची वाट चालूं लागले त्यांच्याप्रमाणेंच तुम्हांलाही हट्टाला पेटून मरायचें आहे, कीं समंजसपणानें बादशहाची बेगम बनून अलम् हिंदुस्थानचें साम्राज्यवैभव भोगायचें आहे !

**येसूबाई :** मी मरेन, पण ही विटंबना सहन करणार नाहीं.–परमेश्वरा, आतां तूंच माझी अब्रु राख ! या काळाच्या मगरमिठींतून आतां तूंच मला सोडव !

**कलुषा :** परमेश्वर ! या वेळीं तुम्हाला सोडविण्यासाठीं कोणता परमेश्वर कसा धांवून येतो तें मला पाहूं दे !

[ **जोत्याजी** प्रवेश करतो. ]

**जोत्याजी :** पतिव्रतेचा छळ करणाऱ्या नरपशो ! हें घे तुझ्या पापाचें प्रायश्चित्त ( कलुषाच्या मानगुटीला धरून त्याला खालीं पाडतो व त्याच्या छातींत खंजीर खुपसतो. )--आईसाहेब. आपली आणि साऱ्या महाराष्ट्राची पूर्वपुण्याई जबर म्हणून हा प्रसंग टळला. आतां देवाचें नांव घ्या आणि एकक्षण देखील न दवडतां माझ्याबरोबर रायगडच्या वाटेला लागा.

**येसूबाई :** रायगडच्या वाटेला लागूं ? आणि तिकडे महाराजांची काय वाट ? त्यांना संकटांत सोडून मी एकटी रायगडीं कशी हो येऊं ?

**जोत्याजी :** असें म्हणून कसें चालेल ? धाकटे राजे रायगडीं आहेत, त्यांची तिकडे काय दशा होईल याचा विचार करा ! त्यांना धीर द्यायचा, ह्या संकटामुळें हवालदिल झालेल्या रयतेला धीर द्यायचा, आणि खाशांच्या मागें राज्य–राखायचेंही डोंगराएवढी जबाबदारी भवितव्यतेनें आतां आपल्या एकटीच्या शिरावर टाकली आहे. या वेळीं महाराजांच्या भवितव्याचा भडिमार आई भवानीवर घालून आपणांला पुढचा पल्ला गांठला पाहिजे !–घ्या देवाचें नांव आणि चला लौकर !

**येसूबाई :** काय करूं आणि काय न करूं असं मला झालं आहे. राजे काळाच्या मगरमिठींत सांपडले, त्यांना सोडून माघारीं जायला जोत्याजी, जीव धजत नाहीं हो ! पण तुम्ही म्हणतां तेंही खरंच आहे. राजांच्या मागें राजवटीच्या रक्षणासाठीं मला रायगडीं जाणं भाग आहे. आई भवानी, या संकटकालीं मला धीर देणारी तूंच आहेस

**मी करीं प्रार्थना । तव पदिं । तुजविण शरण वद जाऊं माते !**
**कोणा ॥ ध्रु० ॥ दुरितधुम दाटला । दश दिशां म्लेंछ हा मातला ।**
**हरुनि त्या तोषवीं भूतला ॥ १ ॥**

[ देवी प्रगट होते, व आशीर्वाद देते—' मुली, तूं राजवटीच्या कल्याणासाठीं सुखदु:खाची चिंता न करतां रायगडच्या मार्गाला लाग. मार्गांत तुला शत्रु अडवूं शकणार नाहीं; आणि कालांतरानें तुझा पुत्र प्रतापशाली छत्रपति होईल, असा माझा तुला आशीर्वाद आहे, ]

**येसूबाई :** ( हात जोडून ) अहाहा ! माते, तूं माझा धांवा ऐकून मला साक्षात्. दर्शन दिलंस,-मी धन्य झालें ! असंच तुझं कृपाछत्र हिंदवी-स्वराज्याच्या मस्तकीं सदैव रुळत राहो !-एवढीच तुझ्या चरणीं या रायगडच्या राणीची प्रार्थना आहे.

[ देवी अंतर्धान पावते. ]

**ॐ तत्सत् ।**